








नोंदणी क्रं. एफ.१६०१४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

वर्ष १५ वें ]    एप्रिल १९६२    [ अंक ७



वार्षिक वर्गणी ९ रु. ]    [ किरकोळ अंक १ रु.





# सुखाचे प्रसंग अधिक सुखद करा

शुभेच्छा अथवा अभिनंदन ... साधी तार न करता 'ग्रीटींग्ज टेलेग्रॅम' पाठवा.

शुभेच्छा - संदेशांच्या तारा एका खास सचित्र कागदावर लिहून तशाच रंगीत, आकर्षक लिफाफ्यांतून पोहोचविण्यांत येतात.

निरनिराळ्या वैयक्तिक आणि सामाजिक समारंभाच्या प्रसंगी पाठवावयाच्या तारांकरिता मजकूर पसंत करण्यासाठी सुखद भावना व्यक्त करणारी अनेक वाक्ये तयार करण्यात आलेली आहेत.

सर्वसाधारण शुभेच्छासंदेशाच्या तारेचा किमान आकार पन्नास नवे पैसे आहे व प्रत्येक जादा शब्दाला सात नवे पैसे पडतात.

## डी लक्स तारेची सोय

आपल्या तारेमुळे विशेष आपुलकी दिसावी असे वाटत असल्यास डी लक्स तार पाठवा.

तुम्हांस पाहिजे त्या क्रमांकाचा संदेश पसंत करा; पण तारेच्या फार्मवर विवक्षित ठिकाणी 'डी लक्स' असे लिहा. तुमची तार एका खास आकर्षक कागदावर लिहून पोहोचविण्यात येईल.

## 'ग्रीटींग्ज' किंवा 'डी लक्स' तार ज्या प्रकारे पाठविणे असेल तसे फॉर्मवर लिहा

टपाल व तार खाते

DA 61/147







अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचें मासिक

वर्ष पंधरावें
अंक सातवा

# नवभारत

एप्रिल
१९६२

संपादक-मंडळ

आचार्य स. ज. भागवत—प्रा. वि. म. बेडेकर—प्रा. गोवर्धन पारीख का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हें मासिक श्री. म. शं. साठे यांनीं दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथें छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनीं प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेंकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक,
'गणेश भुवन' २७६, तेलंग रोड, माटुंगा–मुंबई १९

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक,
C/o प्राज्ञ प्रेस, वाई ( जि. सातारा )

३ चौकशी : श्री. वा. वि. कोनकर
१८८ एफ्. भीमरावबाडी, मुंबई २
फोन नं. २३५५४

# बौद्धागमार्थसंग्रहः

पाली व संस्कृत ] [ मूल्य रु. २०

संपादक : डॉ. पी. एल्. वैद्य एम्. ए., डी. लिट. (पॅरिस)

अखिल भारतीय कीर्तीचे पंडित श्री. वैद्य यांनीं पाली व संस्कृत अशा समग्र बौद्ध साहित्याचें मंथन करून बुद्धचरित्रासंबंधीं व बुद्धाचे उपदेशपर संदर्भ यांत ग्रथित केले आहेत. या ग्रंथाच्या परिशीलनानें बौद्ध धर्माचें वा हीनयान व महायान या दोन्ही बौद्ध संप्रदायांचें सर्वांगीण दर्शन होईल. विद्वान व विद्यार्थी या दोघांना संग्राह्य असा हा संदर्भ ग्रंथ आहे. मूळ पाली व मूळ संस्कृत अशा बुद्धोक्तींचा हा संग्रह आहे.

याचा मराठी अनुवाद महाराष्ट्र राज्य, साहित्य व संस्कृति मंडळ लवकरच प्रसिद्ध करणार आहे.

बुद्धवंस, चरियापिटक, निदानकथा, ललितविस्तर, सुत्तनिपात, महावग्ग, चुल्लवग्ग, सुमंगलविलासिनी, महापरिनिब्बाण, समन्तपासादिका, दीघनिकाय, संयुत्तनिकाय, अंगुत्तरनिकाय, मज्झिमनिकाय, विसुद्धिमग्ग, बोधिचर्यावतार, मिलिन्दपञ्ह, थेरगाथा, थेरीगाथा, मध्यमकशास्त्र, शालिस्तंबसूत्र, समाधिराजसूत्र, लङ्कावतारसूत्र, सद्धर्मपुण्डरीक या ग्रंथांतील बुद्धचरित्र, भिक्षुभिक्षुणीशिक्षण, धर्म, प्रकीर्णक व संगीति अशा पांच विषयावरील संदर्भ यांत घेतले आहेत.

मिळण्याचें ठिकाण —

प्राज्ञ पाठशाळा मंडळ, वाई (सातारा)

अनुक्रमणिका







# सार-संकलन

## सोविएट-चीन संबंध

ऑब्झर्वर ( लंडन )च्या दि. २८ जानेवारी १९६२ च्या अंकांत ऐझॅक डयशर यांचा सोविएट-चीन संबंधांची मीमांसा करणारा एक महत्त्वाचा लेख प्रसिद्ध झाला आहे. त्याचा हा थोडक्यांत सारांश :

" सोविएट-चीन मतभेद विकोपास जाण्याचीं चिन्हें कांहीं काळ दिसत आहेत. हा कलह उजेडांत येण्याची शक्यता दोन्ही बाजूंनीं गृहीत धरली असून आपापली भूमिका मजबूत करण्याचे प्रयत्न उभयपक्षीं सुरू आहेत.

" उत्तर कोरिया, उत्तर विएटनाम व बरेचसे इंडोनेशियन यांचा चीननें पाठिंबा मिळविला आहे. चीनविरोधी भूमिका घेणारे अजय घोष यांच्या मृत्यूनंतर भारतीय कम्युनिस्ट पक्षांतहि पाठिंबा मिळविण्याचे चीनचे प्रयत्न सुरू आहेत. एकंदरीनें आशियांत क्रुश्चेव्हपेक्षां माओला अधिक पाठिंबा आहे. आफ्रिका व लॅटिन अमेरिका येथील चित्र अजून अनिश्चित आहे. युरोपांतील कम्युनिस्टांनीं मात्र अल्बेनियाचा अपवाद वगळल्यास, अजून तरी क्रुश्चेव्हलाच पाठिंबा दिला आहे. त्यांतील कांहींची तरी क्रुश्चेव्ह हा वाद मिटवील अशी अपेक्षा होती. त्यामुळें त्यांना अल्बेनियाच्या प्रकरणानें धक्का बसला आहे. सामान्य अनुयायांत यामुळ संभ्रमाचें वा गोंधळाचें वातावरण निर्माण झालें आहे. कलहाचे संभाव्य परिणाम दोहोंनाहि भोगावे लागतील हें उघड आहे. सोविएट साहाय्य गमावण्याचा चीनवर प्रसंग येणार आणि सोविएटला एक महत्त्वाचा मित्र गमवावा लागणार. याशिवाय वैचारिक गोंधळ निर्माण होईल तो निराळाच.

" या कलहाचें कारण तरी कोणतें ? वैचारिक किंवा धोरण विषयक कारण महत्त्वाचें आहे काय ? पाश्चात्य राष्ट्रांबाबतच्या दृष्टिकोनाचा मतभेद कलहाचें समर्थन करूं शकत नाहीं. लाओस किंवा दक्षिण विएतनाम यासारख्या कलहयुक्त प्रश्नांबाबत चीननें आजवर तरी सोविएट धोरणाचाच पाठपुरावा केला आहे. जागतिक महायुद्ध सुरूं करण्याविषयीं चीन सोविएटला चिथावणी देत आहे हेंहि म्हणणें खरें वाटत नाहीं. कम्युनिस्ट विचारसरणीचा अधिकृत अर्थ कोण लावणार याबद्दलहि वाद आढळत नाहीं. समाजवादी राष्ट्रांचें नेतृत्व सोविएटकडेच आहे असा आग्रह अलीकडे चीननेंच धरला होता हें प्रसिद्ध आहे. सोविएट नेतृत्व कमकुवत करण्याऐवजीं त्याला मजबुती आणण्याचा चीनचा प्रयत्न दिसतो. हें सारें ढोंगच समजावयाचें काय ? स्टालीनविरोधी मोहिमेनें चीन दुखवला गेला आहे असेंहि दिसत नाहीं. माओचे स्टालीनशीं नेहमीच मतभेद होते. स्टालीनचा आदेश धाब्यावर बसवूनच त्यानें सत्ता हस्तगत केली हें प्रसिद्ध आहे. स्टालीनविरोधी मोहीम सुरू होतांच क्रुश्चेव्हच्याहि पुढें जाऊन त्यानें " आमच्या बागेंत शेकडों फुलें उमलूं देत " ही घोषणा केल्याचें प्रसिद्धच आहे. तात्पर्य, या वाढत्या कलहाचा अर्थ लावण्याच्या दृष्टीनें यांतील कोणतेंहि कारण पुरेसें दिसत नाहीं.

" गेल्या वर्षांत क्रुश्चेव्हनें या बाबतींत आक्रमक धोरण स्वीकारलेलें दिसतें. त्याच्या या वर्तनाचा अर्थ लावायचा म्हणजे कलह अपरिहार्य आहे असें समजून त्यासाठीं तो तयारी करीत असावा असें

मानावें लागतें. व त्यासाठीं पाश्चात्य राष्ट्रांशीं अत्यंत मोठ्या स्वरूपाचा समझोता करण्याची, विशेषत: जर्मन प्रश्नाबाबत समजूतदार धोरण स्वीकारण्याची, त्याची तयारी असावी असें दिसतें.

"या बाबतींत थोडासा मागचा इतिहास पाहाणें जरूर आहे. १९५३ च्या मार्च महिन्यांतच सोविएट प्रेसिडियममध्यें पूर्व जर्मनीचा प्रश्न चर्चेसाठीं निघाला होता. त्यावेळीं सोविएट अंतर्गत परिस्थिती अत्यंत वाईट होती. शेतीचें उत्पादन घटत होतें. औद्योगिक क्षेत्रांत अनेक अडचणी होत्या. उपभोग्य वस्तूंचा तुटवडा होता. स्टालीननंतर अधिकारपदावर आलेल्यांचें अधिष्ठान दुर्बल होतें. अशा परिस्थितींत सुरक्षिततेच्या दृष्टीनें सोविएटनें जर्मनीचें लोढणें गळयांतून काढून टाकावें ही कल्पना पुढें आली. मॅलेंकॉव्ह व बेरिआ यांनीं ती पुढें मांडली. सोविएटनें पूर्व जर्मनींतून सैन्य मागें घेण्याचा निर्णय घेतल्यास पश्चिम जर्मनींत तसें करण्यास पाश्चात्य राष्ट्रें तयार होतील व न झाल्यास त्यांना तसें करणें भाग पडेल असें यांचें म्हणणें. त्या योगानें पूर्व युरोप व सोविएट राजवट सुरक्षित होऊं शकेल अशी अपेक्षा त्यांनीं व्यक्त केली होती. जरूर पडल्यास एकतर्फी निर्णय घेऊन सैन्य मागें घ्यावें अशी त्यांची भूमिका होती. या योजनेच्या व्यवहार्यतेविषयीं अंदाज घेण्यास हरकत नाहीं अशी भूमिका मोलोटॉव्ह व कागानोविच् यांनीं घेतली. परंतु एकतर्फी सैन्य काढून घेण्याच्या कल्पनेला मात्र विरोध केला. कारण केवळ जर्मनीच नव्हे तर सर्व पूर्व युरोपांतील कम्युनिझमला त्या योगानें धोका उत्पन्न होईल. सोविएटवर त्याचे काय परिणाम होतील हें सांगणें कठीण. अशी भूमिका त्यांनीं घेतली होती. एक क्षण असाहि येऊन गेला कीं ज्यावेळीं ही योजना शक्य आहे असें वाटून पॉलिट् ब्यूरोनें तसा निर्णयहि घेतला. परंतु तो प्रत्यक्षांत आणण्याच्या आंतच बर्लिनमध्यें बंडाळी झाली व मोलोटॉव्हची भीति साधार वाटूं लागली. बेरिआची मान गेली व ही योजना मागें पडली.

"क्रुश्चेव्हनें या बाबतींत प्रथमपासूनच निश्चित भूमिका घेतली नव्हती. यामुळें बदललेल्या परिस्थितीशीं जुळतें घेणें त्याला शक्य झालें. उपभोग्य वस्तूंचें उत्पादन वाढवण्यास त्यानें नकार दिला. शेतींत अधिक भांडवल गुंतविण्याच्या कल्पनेऐवजीं त्यानें नवी जमीन लागवडीखाली आणून उत्पादन-वाढ करण्याचा मार्ग काढला. कांहीं काळ मोलोटॉव्ह हा परराष्ट्रीय धोरणाच्या क्षेत्रांत प्रमुख होता. परंतु पुढें अंतर्गत कारभाराचीं सूत्रें क्रुश्चेव्हनें हातीं घेतल्यानंतर ही परिस्थिती पालटली व क्रुश्चेव्हनें आपला 'मधला मार्ग' आखला. तथापि हाहि मार्ग यशस्वी झालेला नाहीं हें उघड आहे. पाश्चात्य राष्ट्रांपासून एकहि महत्वाची सवलत तो अजून मिळवूं शकलेला नाहीं. या कालहरणाच्या मार्गामुळें रशियाचें औद्योगिक सामर्थ्य वाढलें व प्रतिष्ठाहि वाढली. हें खरें असलें तरी अजून त्यांची खरी अडचण जर्मन प्रश्न हीच आहे. पश्चिम जर्मनी हें युरोपांतील आज सर्वांत पुढारलेलें औद्योगिक राष्ट्र आहे. म्हणून यापुढें आणखी काळ घालविणें मॉस्कोच्या दृष्टीनें धोक्याचें आहे.

यामुळें क्रुश्चेव्ह हा पुन: मेलेंकॉव्ह-बेरिआच्या धोरणाच्या दिशेनें झुकूं लागल्याचीं चिन्हें दिसत आहेत. मोलोटॉव्हवर पुन: कडाडून हल्ला होण्याचें हेंच कारण असावें. चीनवरहि क्रुश्चेव्हनें हल्ला चढविला त्याची हीच पार्श्वभूमी आहे. पूर्व जर्मनींतून काढता पाय घेण्यांत आला तर माओ त्यावर कडाडून हल्ला करणार हें उघड आहे. यामुळें आधींच माओवर हल्ला चढविणें हा त्यावर उपाय होय. जर्मनीची जबाबदारी दूर होऊन कायमचा सलोखा झाल्यास क्रुश्चेव्हच्या दृष्टीनें तो एक मोठाच लाभ ठरेल. त्यासाठीं सोविएट-चीन मैत्रीची किंमत देण्यासहि त्याची तयारी असावीसें वाटतें.

हा निष्कर्ष आश्चर्यजनक वाटतो खरा. पण पूर्व जर्मनीतून काढता पाय घेतल्यानें– अगदीं एकतर्फी कृतीनें देखील– तेथील कम्युनिस्ट राजवट नष्ट होईल वा जर्मनीचें एकीकरण घडून येईलच असें नाहीं, अशी क्रुश्चेव्हची अपेक्षा असण्याचा संभव आहे. रशियांतील अंतर्गत परिस्थिती सुद्धां आज पुनः १९५३ साला सारखीच आहे. शेती व खावटीच्या वस्तूंच्या उत्पादनाच्या बाबतींत क्रुश्चेव्हनें आपला विरोधक मेलेंकॉव्ह याचेंच धोरण आतां स्वीकारलें असें दिसत आहे. व परराष्ट्रसंबंधांच्या बाबतींतहि तसेंच होण्याचा संभव आहे.

## ब्रह्मदेशांत लष्करी सत्ता

ब्रह्मदेशांत नुकत्याच प्रस्थापित झालेल्या लष्करी सत्तेविषयीं दि. ८ मार्च १९६२ च्या अंकांत मँचेस्टर "गार्डियन" लिहितो : "ब्रह्मदेशाचे सेना–प्रमुख जनरल ने विन यांनीं १९५८ सालीं पंत-प्रधानांच्या निमंत्रणावरून अधिकारसूत्रें हातीं घेतलीं होतीं. यावेळी त्यांनीं सनदशीरपणाचा उपचार बाजूस ठेऊन पंतप्रधानांना अटक केली आहे. गेल्या वेळीं ने विन्नें मुलकी सत्ता प्रस्थापित करण्याचें अभिवचन दिलें होतें ; तें त्यानें पाळलेंहि. मात्र या साठीं सुरवातीस जाहीर केलेल्याच्या मानानें तिप्पट वेळ त्यानें घेतला होता. आतां सैन्यानें मुलकी सत्ता केवळ ती कशी काय काम करते हें पाहण्यासाठीं हंगामी स्वरूपांतच स्थापन केली होती असें दिसतें. आपलें काम तिला समाधानकारक रीतीनें पार पाडतां आलें नाहीं असा निष्कर्ष आतां सैन्यानें काढलेला दिसतो. आणि या वेळीं मुलकी सत्ता पुनः प्रस्थापित होण्याविषयीं कोणीहि काही म्हटलेलें नाहीं.

" अठरा महिने चाललेल्या गेल्या वेळच्या लष्करी राजवटीमुळें ब्रह्मदेशाचे कांहीं तात्पुरते फायदे झाले. आर्थिक क्षमता वाढली, लांचलुचपतीला आळा बसला आणि विशेष म्हणजे राजधानीपासून लांब असणाऱ्या प्रदेशांत शांतता व सुरक्षितता निर्माण झाली. आपल्या कृतीला जनतेची संमति मिळविण्याची जबाबदारी नसल्यानें लष्करी राजवटींना या गोष्टी करतां येतात. तथापि त्यामुळें लादण्यांत आलेली शिस्त ब्रह्मी लोकांना आवडली नाहीं. म्हणून निवडणुकांत त्यांनीं युनुंना भरघोस पाठिंबा दिला. शिवाय लष्करी राजवटींत सुरुवातीस होऊं शकलेल्या सुधारणांचा क्रम पुढें तसाच राखतां आला असता कीं नाहीं याबद्दल शंका आहेच. यामुळें ब्रह्मदेशाच्या खऱ्या अडचणींनीं पुनः तोंड वर काढण्यास सुरुवात केली आहे. लष्करी राजवट गेल्यानंतर ही सुरुवात झाली; पण तेव्हांपासून बिघडत गेलेल्या परिस्थितीला केवळ मुलकी सत्ताच जबाबदार आहे असें वाटत नाहीं, ही गोष्ट आतां लष्करी अधिकाऱ्यांच्या ध्यानांत आल्यावांचून राहाणार नाहीं.

विशेषतः देशांतील अल्पसंख्यांकांचे प्रश्न आपण युनुपेक्षां अधिक चांगल्या रीतीनें सोडवूं शकतों हें लष्करी राजवटीस दाखवावें लागेल. शान् जमातीची संयुक्त राज्यघटनेची मागणी युनु मान्य करतील अशी भीति वाटल्यामुळें लष्करानें यावेळीं उठाव केला असें म्हटलें जातें. शान् ( आणि कारेन आणि काचेन आणि शिन् ) इत्यादि अल्पसंख्यांकांचे प्रश्न कसे सोडवायचे हा सर्व ब्रह्मी राजवटीपुढील शेकडों वर्षांचा प्रश्न आहे. दडपशाहीनें तो सुटलेला नाहीं. आतां ब्रह्मदेशाचे नवे राज्यकर्ते या बाबतींत काय करतात हें पहावयाचें आहे.

## पेकिंगमधील परदेशीय विद्यार्थ्यांत असंतोष

चिनी कम्युनिस्ट अधिकारी आणि लॅटिन अमेरिका, आशिया आणि आफ्रिका यांतील निरनिराळ्या भागांतून आलेले विद्यार्थी, यांच्यांत अलीकडे अनेक कलह झाल्याचें वृत्त आहे. या परदेशीय विद्यार्थ्यांची मुख्य तक्रार अशी कीं ते अडकून पडले आहेत. त्यांना हवे तेव्हां आपल्या देशास परत जातां येत नाहीं. आपल्या वाडवडिलांत कोणीतरी चिनी होता










या कारणास्तव चीननें आपणांस खास सवलती दिल्या आहेत, हें या विद्यार्थ्यांना माहीत आहे व त्याबद्दल ते कृतज्ञहि आहेत. परंतु म्हणून चीनमध्यें बेमुदत राहाण्याचें आपण कबूल केलें होतें असें नव्हे, असें त्याचें म्हणणें. यांतील बहुतेक सर्व १९५५ सालीं चीनमध्यें आले. चिनी भाषा व संस्कृति यांचें अडीच वर्षें अध्ययन केल्यानंतर त्यांना परत जायचें होतें. त्याऐवजीं १९५८ सालच्या आर्थिक विकासाच्या "बड्या झेपेंत" ( Great Leap ) त्यांना स्वयंसेवक म्हणून प्रचारकार्य करावें लागलें. त्यांनीं जाण्यासाठी परवानगी मिळावी म्हणून अनेक वेळां अर्ज विनंत्या केल्या; कित्येक वेळां बाचाबाचीचे वा कलहाचे प्रकार घडले, आणि चीनमधील सहा वर्षांच्या वास्तव्यानंतर कांहीं आठवड्यापूर्वीच "तीन दिवसांत बाहेर पडा" असा चिनी अधिकाऱ्यांनीं त्यांना हुकूम दिला ! आफ्रिकेंतील एका सोमाली विद्यार्थ्यानें तर बाहेर जाण्याची परवानगी मिळावी म्हणून अन्नसत्याग्रहापर्यंत पाळी आणली होती ! "आमच्या बाबतींत अत्यंत कडक स्वरूपाचा भेदभाव करण्यांत आला. चिनी विद्यार्थी वा जनता यांच्यांत मिसळणें आम्हाला अशक्यच झालें होतें." हें या विद्यार्थ्यांचें म्हणणें अतिरंजित असण्याचा संभव आहे. पण परकीय विद्यार्थ्यांना अलग ठेवण्याचे प्रकार पेकिंगमध्यें घडत असून त्यामुळें परदेशांतून येणाऱ्या या तरुणांची निराशा होत आहे यांत शंका नाहीं. कांहीं प्रमाणांत हा अलगपणा अपरिहार्य आहे. एकतर भाषेची अडचण, आपलें अध्ययन परदेशी विद्यार्थ्याला निदान वर्षभर तरी सुरू करतां येत नाहीं. शिवाय चीनमधील आजचें अत्यंत कडक शिस्तीचें वातावरण कित्येक परदेशी विद्यार्थ्यांना सहन होत नाहीं. कांहीं वेळां अधिक चांगली भोजनाची व राहाण्याची व्यवस्था करतां यावी म्हणूनहि या विद्यार्थ्यांना अलग केलें जातें, असें चिनी कम्युनिस्ट अधिकाऱ्यांचें म्हणणें आहे. तसेंच सगळेच परदेशीय विद्यार्थी असंतुष्ट आहेत असें म्हणतां यावयाचें नाहीं. कांहींनी चीनमधील राजकीय जीवनांतहि भाग घेतल्याचीं उदाहरणें आहेत.

## शिक्षण आणि राजकारण

मागस राष्ट्रांत अनेक वेळां शिक्षण व राजकारण यांची गल्लत होते. आणि उच्च शिक्षणाच्या क्षेत्रांत वा विद्यापीठांच्या बाबतींत तर ती होऊं देणें सर्वथैव अनिष्ट होय. लोकशाहीच्या दृष्टीनें ही प्रवृत्ति अत्यंत हानिदायक ठरते. ही शिक्षणक्षेत्रांतील विचारवंतांची भूमिका "नेचर" या प्रसिद्ध साप्ताहिकाच्या ३० डिसेंबर १९६१ च्या अंकांत घानांतील अलीकडच्या कांही घडामोडींवर टीका करतांना पुनः मांडण्यांत आली. प्रस्तुत लेख उद्बोधक असल्यानें त्याचा थोडक्यांत सारांश येथें दिला आहे–

"घानांतील तीन मंत्र्यांनीं तेथील दोन्ही विद्यापीठांतील विद्यार्थ्यांना सक्त ताकीद दिल्याचें वृत्त नुकतेंच आलें आहे. हे विद्यार्थी अत्यंत उर्मटपणें वागत असून राज्यविरोधी वर्तन करीत आहेत. वसाहतवादी भूतकाळांतून हा वर्तनक्रम त्यांनीं उचलला आहे, म्हणून त्यांना ताकीद देण्यांत येत आहे असें मंत्र्यांचें म्हणणें आहे. कोणीहि– मग तो विद्यार्थी असो वा इतर कोणी असो– राज्यविरोधी वर्तन केल्यास त्यास ताकीद देणें आवश्यक व रास्त आहे हें आम्हास मान्य आहे. किंबहुना जरूर तर त्याला शिक्षाहि व्हायला पाहिजे. परंतु राज्यविरोधी वर्तन व सत्तारूढ पक्षाचा उघड विरोध यांत निदान लोकशाहीपुरतें तरी बोलायचें झाल्यास, फरक आहे. आणि कोणावरहि– विशेषतः विद्यार्थ्यांवर– उर्मटपणाचा आरोप करणें हें तर कांहीसें पोरकटपणाचेंच आहे.

घानांत दोन विद्यापीठें असून दोहोंचेहि कुलपति घानाचे राष्ट्राध्यक्ष क्वामे न्क्रुमा हेच आहेत. त्यांचें कुलपतिपद जाहीर रीत्या साजरें करण्यासाठीं झालेल्या








समारंभांत विद्यार्थ्यांनीं फारसा उत्साह दाखविला नाहीं. ब्रिटनमध्यें वा अमेरिकेंत असें कदाचित् घडलें नसतें. यामुळें अध्यक्षांना त्याबद्दल विषाद वाटला असल्यास तें सहज समजूं शकतें. अर्थात् एकाच व्यक्तीला देशांतील सर्व विद्यापीठांचे कुलपति करण कांहीसें धोक्याचेंच आहे. प्रत्यक्ष घानापुरतेंच बोलायचें झाल्यास विद्यापीठांच्या स्वायत्ततेच्या दृष्टीनें ही घटना फारशी उचित म्हणतां येणार नाहीं.

गणवेश ( शैक्षणिक ) वापरण्यास मनाई करण्यांत आली आहे. आणि " अध्यक्षांबद्दल अनादराची भावना निर्माण केल्याबद्दल " कांहीं प्राध्यापकांना बडतर्फ करण्यांत यावयाचें आहे. पहिली गोष्ट कांहीशी अर्थशून्य आहे. दुसरी अधिक गंभीर असून तिचा विचार होणें आवश्यक आहे. विद्यार्थी राजकारणांत भाग घेतात व विद्यापिठांतील विद्यार्थी तो घेण्याच्या वयाचेहि असतात. विचारपूर्वक वागणें ही विद्यार्थ्यांची जबाबदारी. त्यानें अविचारानें कांहीं केल्यास त्याला शिक्षा करणें हें अधिकाऱ्यांचें काम. मात्र तें विद्यापीठाच्या अधिकाऱ्यांचें काम, बाहेरच्या सत्ताधीशांचें नव्हे.

विद्यार्थ्यांनी गैरशिस्त वर्तन केल्यास त्यांना काढून टाकण्यांत येईल, असें तिन्ही मंत्र्यांनीं जाहीर केलें आहे. तथापि हें त्यांचें काम नव्हे. ही ताकीद विद्यापीठाच्या अधिकाऱ्यांकडून यायला हवी, मंत्र्यांकडून नव्हे. विद्यापीठांच्या अधिकाऱ्यांची एक महत्त्वाची जबाबदारीच त्यायोगें नाहींशी होते. कोठल्याहि विद्यापीठाला ही परिस्थिती असह्य वाटणें स्वाभाविक आहे. एका मंत्र्यानें तर याच्याहि पलीकडची मजल गाठली आहे. विज्ञान व तंत्रविद्या यांचें संचालन करणाऱ्या विद्यापीठाच्या मंडळाला यापुढें आपल्या संचालनकार्यांत सरकारी आदेशानुसार वागावें लागेल. आणि विद्यापीठांतील कोणालाहि घानाचे अध्यक्ष क्वामे न्क्रुमा यांचेविषयीं नितांत श्रद्धा व आदर न बाळगल्यास बाहेर काढलें जाईल असें त्यानें जाहीर केलें आहे. हें विधान वाच्यार्थानें घेतल्यास ही एक भयंकर हुकुमशाहीच म्हटली पाहिजे. ह्याचा अर्थ उकलणें कठीण आहे. पण तीन गोष्टी त्यांत स्पष्ट दिसतात. एक, प्राध्यापकांच्या नेमणुका करतांना त्यांचीं नांवें सरकारमान्य असलीं पाहिजेत. दोन, विद्यार्थ्यांची निवड करतांना त्यांच्या राजकीय मतांचा विचार केला जाईल. व तीन, विद्यापीठाचे अधिकारी, प्राध्यापक व विद्यार्थी यांचें वर्तन सरकारी लहरीप्रमाणें बदललें पाहिजे ! अशाप्रकारें चालणाऱ्या विद्यापीठांत स्वायत्ततेचा मागमसहि राहाणार नाहीं, विचार, उक्ति वा वर्तन यांचें स्वातंत्र्य नष्ट होईल व लोकशाही ध्येयांची जोपासना अशक्य होईल. हीं विद्यापीठें विद्यापीठें राहाणार नाहींत, असा याचा अर्थ आहे.

## भारतीय निवडणुका व भारत–चीन सीमाप्रश्न

भारतीय निवडणुकांच्या निमित्तानें भारत–चीन सीमाप्रश्नाचा ऊहापोह करणारा एक लेख डोरोथी वुडमन् यांनीं ९ मार्च १९६२च्या ' न्यू स्टेट्स्मन ' मध्यें लिहिला आहे. त्यांतील कांहीं महत्त्वाचा भाग येथें देत आहोंत.

" भारताचा चीनविषयींचा भ्रमनिरास आणि चौ एन लायनें आपला विश्वासघात केला ही नेहरूंची भावना सहज समजूं शकते. चीननें तिबेट पादाक्रांत केल्यानंतर आसामचा कांहीं भाग चीनमध्यें समाविष्ट करणारे नकाशे पहाण्यांत आल्यानें भारतांत चीनच्या हेतूविषयीं संशयाचें वातावरण निर्माण झालें. नेहरूंनी चीनशीं मैत्रीचे संबंध गृहीत धरल्यामुळें हे नकाशे प्रसिद्ध करण्याबद्दल चीनकडे असंतोष व्यक्त केला. हे नकाशे थोडीशी फुरसत मिळतांच सुधारण्यांत येतील असें चिनी परराष्ट्र कचेरीनें व स्वतः चौ एन् लायनीं वेळोवेळीं आश्वासन दिलें. भारताचें म्हणणें वादग्रस्त आहे असें त्यांनीं केव्हांहि म्हटलें नाहीं किंवा सूचितहि केलें नाहीं. कोमिंगटँगच्या काळांत तयार झालेले हे नकाशे बद-








लले जातील अशींच चिन्हें होतीं. चीननें सीमावाद कधींहि पुढें आणला नाहीं. सीमाप्रदेशांत कांहीं तुरळक वादग्रस्त घटना घडल्या खऱ्या. पण त्या लगलीच समजूतदारपणानें मिटविण्यांत आल्या.

१९५७ मध्यें हें " पंचशील वातावरण " बदलू लागलें. तिबेटमध्यें बंडाळी सुरू झाली व चीननें सिंकियांगमधील सैन्याच्या हालचाली सुलभ व्हाव्यात यासाठीं जुन्या व्यापारी मार्गांच्या आधारानें चँग-चेमो खोरें व अक्साइचीनचें पठार यांतून यार्केड व गार्टोक यांना जोडणारा रस्ता बांधावयास सुरुवात केली. चीनने १९५४ चा करार पाळला असता व भारताला चीनशीं व्यापार करण्याची सवलत कायम ठेवली असती तर हा रस्ता दोन्ही राष्ट्रांना उपयुक्त ठरला असता व तो बांधण्यासाठीं भारतानें संमतीहि बहुधा दिली असती. तथापि चीनचे हेतु शुद्ध नव्हते. १९५८ मध्यें भारताच्या परराष्ट्र सचीवानें भारताची परवानगी न घेतां, किंबहुना त्याला न कळवितां, हा रस्ता बांधल्याबद्दल चीनकडे आश्चर्य व खेद व्यक्त केला. भारत–चीन संबंध बिघडण्यास आरंभ झाला...

या परिस्थितीमुळें हिमालयाच्या प्रदेशांत उभय राष्ट्रांकरवीं अतोनात लष्करी खर्च सुरू आहे. भारतांतील निवडणुका आता संपल्या असून आणखी पांच वर्षें कॉंग्रेस अधिकारपदावर राहाणार आहे. सीमाप्रदेशांतील आक्रमणासंबंधीं भारतीय प्रतिक्रियेचा चीनला अंदाज आला असून तो पुनः नव्यानें आक्रमण करणार नाहीं असें निश्चितपणें सांगतां येत नाहीं. पण चीनमध्यें सध्या अंतर्गत प्रश्नांनीं गंभीर स्वरूप धारण केलें आहे. चीनच्या आशियाई धोरणाविषयीं रशियाचा दृष्टिकोनहि अनिश्चित आहे. तथापि चीननें अलीकडेच गेलेल्या भारतीय खलित्याला उत्तर म्हणून या प्रदेशांत सांकेतिक माघार घेतल्यास १९५४ च्या करारांचें नूतनीकरण करण्यासंबंधीं पुनः बोलणीं सुरूं होण्याचा संभव आहे.

या बाबतींत लडाखमध्यें बांधला गेलेला अक्साई-चीन मार्ग हा खरा कठीण प्रश्न आहे. तथापि चीन-ब्रह्मदेश सीमेवर मागें एकदां निर्माण झालेल्या परिस्थितीचें लडाखमधील परिस्थितीशीं कांहीसें साम्य आढळतें. भामो आणि नामखान यांना जोडणारा चिनी सरहद्दीवरील रस्ता ब्रिटिशांनीं बांधला होता. १८९७ सालच्या करारानुसार हा रस्ता ब्रिटिशांकडे कायमच्या ' लीज 'वर राहिला होता. ब्रिटिश ब्रह्मदेशांतून जाईपर्यंत ही परिस्थिती कायम होती. भारत–चीन सीमाप्रश्नाबाबत देखील अशी कल्पना निघणें शक्य आहे. चीननें अक्साईचीनचा प्रदेश कायमचा लीजनें घ्यावयाचा व रस्ता दोन्ही राष्ट्रांच्या उपयोगासाठीं खुला ठेवायचा या कल्पनेच्या आधारावर भारत-चीन करार व्यवहार्य वाटतो. निवडणुकीच्या प्रचारकाळांत आम्हाला सीमाप्रश्न सोडवायचा आहे. तो न सुटल्यास भारत व चीन यांना परस्परविरोधी भूमिकेंत पांचपन्नास वर्षें काढावीं लागतील व ही परिस्थिति भारताच्या, चीनच्या, व सर्व आशियाखंडाच्या दृष्टीनें धोक्याची ठरेल असे उद्गार नेहरूनीं काढले आहेत.

---

डॉ. ना. य. डोळे

# भारताचें परराष्ट्रीय धोरण : देशाचें, कॉंग्रेसचें कीं नेहरूंचें ?

नुकत्याच झालेल्या उत्तर मुंबई मतदारसंघांतील निवडणुकीला अनन्यसाधारण महत्त्व प्राप्त झालें होतें. देशांतीलच नव्हे तर जगांतील अनेक लोकांचें लक्ष या निवडणुकीकडे लागलें होतें, इतकें कीं फुलपूर मतदारसंघांतील नेहरू-लोहिया निवडणुकीलाहि दुय्यम स्थान मिळालें. तात्विक व्यक्तिगत असे अनेक प्रश्न या निवडणुकींत गुंतले होते हें खरें असलें तरी भारताचें परराष्ट्रीय धोरण हा या निवडणुकींतील महत्त्वाचा प्रश्न आहे असें कांहीं लोकांनी जाणतां-अजाणतां पसरवून दिलें होतें. मेनन यांचा पराभव होणें म्हणजे पं. नेहरूंच्या परराष्ट्रीय धोरणावर जनतेनें अविश्वास दाखविणें होय असा प्रचार मुद्दाम करण्यांत आला. परराष्ट्रीय धोरण ठरविणें व त्याची अम्मलबजावणी करणें यामध्यें श्री. कृष्ण मेनन यांचा वाटा नेहरूंपेक्षांहि अधिक आहे असें भासविण्यांत आलें. याउलट या धोरणासंबंधीं किंवा भारतसरकारच्या एखाद्या कृतीबद्दल सर्व मंत्रिमंडळ सामुदायिकरीत्या जबाबदार आहे; मेनन ही व्यक्ति नव्हे, असाहि प्रचार करण्यांत आला. 'परराष्ट्रीय धोरणाची सर्व जबाबदारी माझ्या शिरावर आहे, त्यांतील दोषांबद्दल किंवा चुकांबद्दल मेनन यांना जबाबदार धरूं नये' असें पंतप्रधानांनींहि सांगितलें. आचार्य कृपलानी निवडून आले तर भारत थोड्याच दिवसांत पाश्चिमात्य गटांत सामील होईल आणि सध्याचें धोरण पार बदललें जाईल, असें सांगण्यांत आलें होतें.

त्याचबरोबर लोकसभेमध्यें कॉंग्रेसपक्षाला बहुमत मिळणार आणि पं. नेहरू हेच पुढील पांच वर्षें पंतप्रधान राहणार, हें सर्व विरोधी पक्ष मान्य करीत होते. म्हणजे नेहरूंच्या परराष्ट्रीय धोरणाला जनतेचा पाठिंबा आहे, हें लोकसभेंत कॉंग्रेसनें पांचशेपैकीं तीनशेहून अधिक जागा मिळविल्या त्यावरून सिद्ध झालें असतेंच. मेनन निवडून आले असते किंवा नसते तरी लोकसभेंतील वा बहुमतांत फारसा फरक पडला नसता. तथापि कांहीं प्रचारकांचें एवढ्यावरच समाधान होणार नव्हतें. मेनन हे मुंबईंत निवडून आले तरच नेहरूंचें परराष्ट्रीय धोरण सर्व देशाला मान्य आहे, हें सिद्ध होईल अशी त्यांची भूमिका होती.

श्री. मेनन यांची मात्र व्यक्तिशः अशी भूमिका असल्याचें दिसत नाहीं. माझा पराभव म्हणजे भारताच्या परराष्ट्रीय धोरणाचा पराभव, असें ते एकदांहि म्हणाले नाहींत. उलट त्यांच्या विजयाबद्दल भरविण्यांत आलेल्या मुंबईच्या सभेंत ते म्हणाले कीं "सत्तागटापासून दूर राहण्याचें धोरण हें देशाच्या इतिहासानें, सध्यांच्या परिस्थितीनें, आणि जागतिक राजकारणांतील भारताच्या स्थानानें, ठरविलें आहे.... जगांत शांतता राखणें हें भारताचें धोरण आहे आणि भारताला याशिवाय दुसरें कोणतें धोरण ठरविता येणें शक्य नाहीं.[1] पं. नेहरूहि हें माझें धोरण आहे किंवा कॉंग्रेसपक्षाचें हें परराष्ट्रीय धोरण आहे असें म्हणत नाहींत. सध्यांचें परराष्ट्रीय धोरण देशाचें आहे असाच याचा अर्थ होतो.

'नवभारत'च्या ऑगस्ट, सप्टेंबर व आक्टोबर १९५४ या तीन अंकांत याबद्दल एकदां चर्चा होऊन गेली आहे. पण मुंबईच्या निवडणुकीमुळें पुन्हां या प्रश्नाला चालना मिळाली आहे. ऑगस्ट १९५४ च्या अंकांत प्रा. डॉ. ना. र. देशपांडे यांनीं

१. पहा : 'टाइम्स ऑफ इंडिया' ५ मार्च १९६२.












असें म्हटलें होतें कीं परराष्ट्रीय धोरणाचे नेहरू हे श्रेष्ठ प्रवक्ते आहेत, निर्माते नव्हेत. त्यांच्या जागीं दुसरा कोणीहि परराष्ट्रमंत्री असता तरी सामान्यपणें सध्यांचेंच परराष्ट्रीय धोरण चालू राहिलें असतें. या लेखावरील चर्चेत श्री. शंकरराव देव यांनींहि भाग घेतला होता. आजच्या संदर्भात मला डॉ. देशपांडे यांचें मत पुन्हां आग्रहानें मांडावें असें वाटतें. आठ वर्षांनंतरहि सध्याचें परराष्ट्रीय धोरण आपल्या देशाचें आहे; एका पक्षाचें वा एका व्यक्तीचें तें नाहीं, हें मान्य करावें लागतें.[२]

१५ ऑगस्ट १९४७ या दिवशीं वृत्तपत्र प्रतिनिधींना एक मुलाखत देऊन पंतप्रधान नेहरूंनीं आपलें परराष्ट्रीय धोरण अधिकृतपणें जगासमोर मांडलें.[3] त्यानंतर तीन सार्वत्रिक निवडणुका पार पडल्या तरी नेहरूच परराष्ट्रमंत्री म्हणून काम पाहत आहेत. पंधरा वर्षांपूर्वी जाहीर केलेल्या धोरणांत फार मोठा क्रांतिकारक बदल झालेला नाहीं ही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे. ( १ ) जागतिक शांतता (२) समृद्धि व (३) स्वातंत्र्य हीं आपल्या परराष्ट्रीय धोरणाचीं तीन उद्दिष्टें आहेत. ( १ ) साम्राज्यवाद ( २ ) आर्थिक विषमता आणि ( ३ ) वर्णभेद हीं तीन युद्धाचीं मूळ कारणें दूर केलीं म्हणजे जगांत शांतता नांदेल अस आपला देश मानतो. युद्ध नको याचीं कारणें अशीं कीं युद्धामुळें प्रश्न सुटत नाहींत; युद्धांत अमाप मनुष्यहानि होते, संपत्तीचा नाश होतो, लोकशाहीचा पहिला बळी पडतो, आणि मानवी विकासाचीं व प्रगतीचीं सर्व कार्ये थांबतात किंवा नष्ट होतात. यासाठीं यूनोवर श्रद्धा ठेवली पाहिजे, यूनो दुर्बल होईल असें आपण कांहींहि करतां कामा नये. यूनो 'शांततापूर्ण सहजीवन' या पायावर उभी आहे. आपलाहि या तत्त्वावर संपूर्ण विश्वास आहे. जगांतील सर्व राष्ट्रांना स्वातंत्र्य मिळावें असा आपला आग्रह आहे. जगांतील राष्ट्राराष्ट्रांत जी कमालीची आर्थिक व सामाजिक विषमता दिसते ती घालविण्यासाठीं सर्व प्रगत राष्ट्रांनीं अप्रगत राष्ट्रांना आर्थिक मदत करावी असें आपण सांगतों. ही मदत बिनशर्त असावी असा आपला कटाक्ष आहे. लष्करी गटामुळें जागतिक शांतता धोक्यांत येते असें आपलें प्रामाणिक मत आहे. त्यामुळें आपण पहिल्या, दुसऱ्या, वा तिसऱ्या अशा कोणत्याच गटाचे पुरस्कर्ते नाहीं. जागतिक शांततेला पोषक असें वातावरण निर्माण करीत राहणें; प्रत्येक प्रश्नाचा स्वतंत्रपणें विचार करून तदनुसार त्यावर मतप्रदर्शन करणें योग्य आहे असें आपण मानतों. कोणत्याच सत्तागटांत आम्ही सामील होणार नाहीं व जागतिक शांतता हवी असेल तर तुम्हीहि लष्करी गटापासून दूर रहा असें आपण इतर राष्ट्रांना सांगत असतों.[४]

या आपल्या भूमिकेमुळें आपलें धोरण संधिसाधुपणाचें आहे; तटस्थतेचें आहे; नकारात्मक किंवा अपुरें, आहे किंवा अतिरेकी शांततावादी आहे असा कांहीं राष्ट्रांचा गैरसमज होतो. जागतिक शांतता हें आपलें मुख्य उद्दिष्ट असल्यानें आपलें धोरण अपुरें किंवा नकारात्मक नाहीं हें उघड आहे. आपलें धोरण तटस्थतेचें नाहीं. तसें तें राहणें शक्यहि नाहीं व इष्टहि नाहीं; आपलें धोरण अति-

२. त्यावेळच्या चर्चेत प्रस्तुत लेखकानेंहि लेख लिहून भाग घेतला होता व डॉ. देशपांडे यांच्याविरुद्ध भूमिका घेतली होती. परंतु नंतर पीएच्. डी. च्या साठीं 'भारताचें यूनोमधील कार्य' या विषयावर अध्ययन करताना डॉ. देशपांडे यांचेंच मत बरोबर असल्याचें आढळून आलें.

३. जवाहरलाल नेहरूंचीं भाषणें : खंड पहिला १९४६–४९ पृष्ठ २७.

४. परराष्ट्रधोरणाच्या सविस्तर चर्चेसाठीं प्रस्तुत लेखकाचें 'जागतिक राजकारणांत भारत' ह्नीनस प्रकाशन हें पुस्तक पहावें.








रेकी शांततावादी नाहीं हें आपण गोवा कारवाईनें सिद्ध केलें आहे. आपल्या स्वार्थाचा विचार न करतां योग्य वाटेल त्यावेळीं आपण ज्या राष्ट्राचें चुकेल त्याच्यावर कठोर टीका करतों. यावरून आपलें धोरण संधिसाधुपणाचें नाहीं हें दिसेल.

या लेखाचा मुख्य उद्देश हा आहे कीं, वर वर्णन केलेलें धोरण ठरविण्यांत नेहरू या व्यक्तीचा वा काँग्रेस या पक्षाचा वाटा किती हें तपासणें. तिन्ही सार्वत्रिक निवडणुकांत परराष्ट्रीय धोरण हा मुख्य निवडणूक प्रश्न नव्हता. सर्व पक्षांचे जाहीरनामे आपण काळजीपूर्वक वाचले तर आपल्या लक्षांत असें येईल कीं, सध्याचें परराष्ट्रीय धोरण सर्वसाधारणपणें सर्व राजकीय पक्षांना मान्य आहे. जाहीरनामा तीस पानांचा असेल तर फारतर दोन तीन पानें परराष्ट्रीय धोरणाला दिलेलीं आढळतात. त्यांतहि गोवा, उत्तर सरहद्द, पाकिस्तानशीं संबंध, अशा एखाद्या प्रश्नावर मतभेद व्यक्त केलेला आढळतो. ' शक्यतोंवर सर्व प्रश्न शांततेच्या मार्गानें सोडविण्याचा प्रयत्न करूं. चीनशींहि वाटाघाटी करूं, वेळ पडल्यास शस्त्रसामर्थ्याचाहि वापर करूं, पण शस्त्राचा वापर विजयाची खात्री झाल्यावरच करूं ' असें परवां नेहरू म्हणाले. हें विधान सर्वमान्यच आहे. वाटाघाटींनीं प्रश्न सुटत असतांनाहि युद्धाचाच अवलंब करा आणि पराजयाची खात्री असतांनाहि शस्त्राचा वापर करा असें कोणताहि राजकीय पक्ष म्हणत नाहीं. उत्तर मुंबईंतहि मेनन यांच्यावरील बरेचसे आरोप देशाच्या परराष्ट्रीय धोरणाबद्दल एकूण मान्यता दर्शवूनच करण्यांत आले होते. सध्याचें परराष्ट्रीय धोरण आम्हाला मान्य आहे, त्याला कलतें करण्याचें काम मेनन करतात तें आम्हाला मान्य नाहीं, असा विरोधकांचा दावा होता.

सध्याचें परराष्ट्रीय धोरण म्हणजे पंधरा वर्षांपूर्वी नेहरूंना एकाएकीं आलेली लहर नव्हे. कारण तशी ती लहर असती तर त्याला अशी सार्वत्रिक मान्यता मिळाली नसती किंवा त्याला सातत्य लाभलें नसतें. हें धोरण ठरण्याचीं मुख्य कारणें अशीं :

( १ ) आपल्या देशाची भौगोलिक परिस्थिति. राजकीयदृष्ट्या आपण लोकशाही स्वीकारल्यानें आपण अमेरिका व इंग्लंड यांच्या जवळ आहोंत आणि रशिया–चीन यांच्यापासून फार दूर आहोंत. भौगोलिकदृष्ट्या मात्र आपण लोकशाही राष्ट्रांपासून फार दूर आणि साम्यवादी राष्ट्रांच्या अगदीं जवळ आहोंत. अशा परिस्थितींत या दोन्ही गटांशीं मैत्रीचे संबंध ठेवणें भारताच्या कोणत्याहि सरकारला अपरिहार्य ठरेल.

( २ ) आपल्या देशाची आर्थिक परिस्थितीहि सध्यांचें परराष्ट्रीय धोरण ठरविण्यास कारणीभूत झालेली आहे. आर्थिक दृष्ट्या मागसलेल्या राष्ट्राला झपाट्यानें प्रगति करावयाची असेल तर इतर प्रगत राष्ट्रांची मदत घेणें इष्ट आहे. आम्ही स्वतःच्या ताकदीवर आमचा आर्थिक विकास करूं हें म्हणणें वास्तवतेला सोडून आहे. आपल्या देशांत पूर्ण भांडवलशाही शाबूत ठेवणें आपल्याला परवडणार नाहीं किंवा आजच पूर्ण समाजवादी अर्थरचना प्रस्थापित करणेंहि आपल्याला शक्य नाहीं. त्यामुळें नियोजनबद्ध विकास; सवाकडून बिनशर्त असेल तर आर्थिक मदत, आणि मिश्र अर्थव्यवस्था, असें आपलें अर्थधोरण आहे. १९४७ सालची परिस्थिति लक्षांत घेतली म्हणजे कोणताहि पक्ष त्यावेळीं सत्तारूढ असता तरी संपूर्ण भांडवलशाही किंवा संपूर्ण समाजवाद याची अम्मलबजावणी करणें त्याला शक्य झालें नसतें. आपली अर्थरचना इंग्लडशी इतकी निगडित आहे कीं त्यामुळें इंग्लड व युरोपीय बाजारपेठेपासून संपूर्ण अलग राहणें आपल्याला अशक्य होतें.[५]

५. राष्ट्रकुलांत सभासद म्हणून राहण्याच्या अनेक कारणापैकीं हें एक महत्त्वाचें कारण आहे.










याशिवाय प्रारंभींच्या काळांत आपण कोणत्या-तरी एका सत्तागटांत सामील झालों असतों तर यादवी युद्धाचा धोका होता.[६] आशियांतील ज्या नवजात राष्ट्रांनीं स्वातंत्र्यानंतर लगेच एक गट निवडला त्यांना स्थिर सरकार कधींच प्राप्त झालें नाहीं हें दिसतें. यादवी युद्धापासून दूर राहावयाचें तर आंतरराष्ट्रीय क्षेत्रांत सर्वांशी मैत्रीचे संबंध ठेवणें पहिल्या कांहीं वर्षांत भाग असतें.

( ३ ) आशिया खंडांत आपलें वैशिष्ट्यपूर्ण स्थान आहे. त्याला भौगोलिक, आर्थिक, धार्मिक व ऐतिहासिक कारणें आहेत. आपली इच्छा नसतां-नाहि आशियाचें नेतृत्व आपणावर लादण्यांत आलें आहे. आपण जो निर्णय घेऊं तो आग्नेय आशियाई राजकारणावर फार मूलगामी परिणाम करणार आहे याची प्रथमपासून आपणाला जाणीव आहे.

( ४ ) आपल्या देशाच्या कांहीं परंपरा आहेत. त्यामधून आपले राजकीय व सामाजिक आदर्श निर्माण झाले आहेत. अन्यायाविरुद्ध कोणा शक्ति-सामर्थ्यवानाची पर्वा न करता बंड उभारणें, सत्याकरितां वाटेल तें सहन करण्याची तयारी असणें; वचनाला–दिलेल्या शब्दाला–जागणें; पददलितांचा कैपक्ष घेऊन उठणें, या गोष्टी आपल्या देशाच्या परंपरेतच आहेत. चीनवर जपाननें स्वारी केली त्या-वेळीं डॉ. कोटणीस यांच्या नेतृत्वाखालीं डॉक्टरांचें एक शुश्रुषापथक गेलें होतें. त्यांत आपणाला कांहीं नवलविशेष वाटत नाहीं. तिबेटच्या दलाई लामांना अभय देण्यांत आपलें कांहीं चुकलें असें सामान्य लोकांना वाटत नाहीं. शांततेची उपासना ही गोष्ट भारतीयांना नवी नाहीं. आपलें कधीं साम्राज्य नव्हतें; साम्राज्य प्रस्थापित करण्यासाठीं, दुसरे देश पादाक्रान्त करण्यासाठीं, भारताच्या सेना कधीं बाहेर पडल्या नाहींत. बुद्धभिक्षू गेले, तत्त्वचिंतक गेले, व्यापारी गेले, पण सैन्य गेलें नाहीं. नेहरू ज्यावेळीं शांततेची आवश्यकता प्रतिपादन करतात त्यावेळीं आपल्याला त्यांत आपल्या राष्ट्रीय स्वभावाविरुद्ध कांहीं आहे असें वाटत नाहीं. शांतिदूत म्हणून नेह-रूंचा गौरव होतो तो आपला सर्वांचा गौरव आहे असा आपणाला भास होतो. आपण संकटांत असलों तरी दुसऱ्याला त्याच्या अडचणींत मदत करणें हा आपला रक्ताचा गुणच आहे. त्यामुळें ‘ चीनी तीर अंगोमें; सेना लढती कॉंगोमें’[७] यांत आपल्याला भलतेंच कांहीं गैर वाटत नाहीं. गाझा पट्टीमध्यें दोन युद्धोन्मुख सेनांच्या मध्यें उभें राहून शांतता प्रस्थापित करावयाचें आवाहन येतांच आपला देश मोठ्या आनंदानें या कामाला तयार होतो व सैन्य पाठवतो. यामध्यें आपल्याला आपण निष्कारण गेलों असें वाटत नाहीं. भारतांतील लोक स्वभावानेंच शांति-प्रिय आहेत. त्यांना युद्धपिपासु बनविणें कोणत्याहि सरकारला अशक्य आहे.

( ५ ) आपल्या राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या चळवळींत आपण कांहीं तत्त्वांचा सतत उद्घोष केला होता. १९२७ मध्यें कॉंग्रेसची परराष्ट्रकचेरी स्थापन झाली तेव्हांपासून प्रत्येक वर्षीं आंतरराष्ट्रीय राजकारणावर कांहीं ठराव पास झालेले आहेत. त्यामध्यें जागतिक सरकार, शांतता, शांततेच्या मार्गानें आंतरराष्ट्रीय प्रश्न सोडविणें, यांचा पुरस्कार आहे. लष्करशाही, हुकूमशाही, साम्राज्यवाद, वर्णविषमता यांना विरोध आढळतो. हींच तत्त्वें आजच्या परराष्ट्रीय धोरणांत आढळतात. याशिवाय महात्माजींच्या विचारांचा आपण संपूर्णरीत्या जरी स्वीकार केला नसला तर

६. तेलंगणांत कम्युनिस्टांनीं प्रारंभीच्या काळांत चुणूक दाखविण्यास प्रारंभ केला होता. आजच्या आपल्या देशाच्या रशियाशी असलेल्या स्नेहसंबंधामुळें कम्युनिस्ट पक्षाला नेहरूसरकारला कडवा विरोध करणें अशक्य झालें आहे.

७. मुंबईंत जनसंघाची एक घोषणा.












त्यांच्या विचाराची छाप आपल्या धोरणावर कांहीं प्रमाणांत आहे हें मान्य करावें लागेल. आपला देश बुद्ध, अशोक, आणि गांधींचा देश असा ओळखला जातो.

**भौगोलिक स्थान, अर्थव्यवस्था, आर्थिक मागसलेपणा, आशियाई राष्ट्रांतील स्थान, सामाजिक व राजकीय परंपरा, व आदर्श, राष्ट्रीय चळवळींत स्वीकारलेलीं मूल्यें, या पांच गोष्टींनीं आपलें परराष्ट्रीय धोरण घडलें आहे. तें एका पक्षाचें वा व्यक्तीचें आहे असें कसें म्हणतां येईल ?** या पांचपैकीं काँग्रेसच्या ठरावांसंबंधीं फार तर श्री. नेहरूंना श्रेय देतां येईल.[८] बाकीच्या चार गोष्टी व्यक्तिनिरपेक्ष आहेत. त्यामुळें काँग्रेस सोडून दुसरा कोणता पक्ष अधिकारावर असता किंवा यापुढें आला, किंवा नेहरूंच्याऐवजीं दुसरा कोणीहि परराष्ट्रमंत्री झाला तरी या परराष्ट्रीय धोरणांत फार मोठा फरक पडणार नाहीं. देशाच्या आर्थिक परिस्थितींत पन्नास वर्षांनंतर मोठा फरक पडला तरी अर्थातच या धोरणांत फरक पडण्याचा संभव आहे.[९] पण त्याहि वेळीं उद्दिष्टांत फरक होणार नाहीं. शांतता हें उद्दिष्ट बदलून युद्धोन्मुखता हें उद्दिष्ट ठेवणें कोणत्याहि खऱ्या भारतीय पक्षाला शक्य होणार नाहीं. आपल्याला पारतंत्र्याचा अनुभव असल्यामुळें आपण दुसऱ्याला आपल्या अंकित कधीं करून ठेवूं हें शक्य वाटत नाहीं. आपल्याला फाळणीचा अनुभव असल्यानें दुसऱ्या देशांच्या फाळणीला कोणताहि खरा भारतीय पक्ष मान्यता देणें शक्य नाहीं. जगांत एक साम्यवाद तरी राहील किंवा भांडवलशाही तरी टिकेल, अशी एकान्तिक भूमिका आपल्या देशांतील कोणताहि पक्ष वा व्यक्ति घेणार नाहीं. शांततापूर्ण सहअस्तित्व हें तत्व आपण आपल्या इतिहासांत हजारो वर्षें पाळत आलेलों आहोंत भौतिक फायदे मिळविण्यासाठीं आपण एका सत्तागटांत जावें, मग स्वातंत्र्य गमावलें तरी हरकत नाहीं, असें उद्यां एखादा पक्ष सांगूं लागला तर त्याला लोकप्रियता कधींच मिळणार नाहीं. पाश्चात्य साम्राज्यशाहीकडे दुर्लक्ष करून आफ्रिकेमध्यें काय चाललें आहे तिकडे आपण पाहूंच नये; तेथील स्वातंत्र्यलढ्याला प्रोत्साहन देऊं नये, अशी भूमिका घेणें हिंदुस्थानांत कोणाला शक्य आहे काय ? कम्युनिझमचें आव्हान लष्करी नाहीं; त्याचा मुकाबला दारिद्य, रोगराई, अज्ञान घालवूनच करतां येईल, लष्करी मदतीनें नव्हे, हें हिंदुस्थानांत

---

८. कारण नेहरू १९२७ पासून काँग्रेसच्या परराष्ट्रीय विभागाचे कार्यवाह होते. व त्यांचे मदतनीस म्हणून डॉ. राम मनोहर लोहिया हे होते.

९. ‘कोणत्याहि सत्तागटांत सामील न होणें’ आणि ‘जागतिक शांततेसाठीं पोषक कार्य करणें’ यांत फरक आहे. सध्याच्या विशिष्ट परिस्थितींत भारतासारख्या राष्ट्रानें कोणत्याहि लष्करी गटांत सामील न होणें जागतिक शांततेला हितावह ठरेल. ही परिस्थिति चिरकाल राहील असें म्हणता येत नाहीं. किंवा तुर्कस्तान, ग्रीस, हंगेरी यांनींहि सत्तागटांतून फुटून निघाल्यास तें निश्चितपणें जागतिक शांततेला पोषकच ठरेल असें म्हणतां येत नाहीं. सध्यां मात्र सत्तागटांत सामील न होणें हेंच उदात्त ध्येय व प्रमुख उद्दिष्ट आहे असा आभास परराष्ट्रीय धोरणाचे कांहीं प्रवक्ते करतात. ‘तटस्थता अनैतिक आहे’ हें डलेसचें म्हणणें जितकें चूक तितकेंच ‘सत्तागटांत सामील न होणें’ हें त्रिकालाबाधित, सर्व देशांना योग्य असें धोरण आहे हें म्हणणें चूक आहे. यावर अधिक विचार होणें आवश्यक आहे.












कोणालाहि पटवून देण्याची आवश्यकता नाहीं. एका गटामध्यें गेल्यानें देशाचे काय हाल होतात याचीं प्रत्यक्ष उदाहरणें आपल्या भोवतीं असतांना लष्करी गटापासून दूर राहण्याचें धोरण बदलून एका गटांत सामील व्हावें असें कोणताहि सुज्ञ नेता सांगणार नाहीं.[१०]

तात्पर्य असें कीं, सध्यांचें परराष्ट्रीय धोरण हें देशाचें– भारताचें– आहे. त्यांत तपशीलासंबंधी किरकोळ मतभेद असतील पण मूलभूत मुद्यांवर देशांत एकमत आहे. परराष्ट्रांतील विचारवन्त हें धोरण नेहरू–मेननचें आहे असें मानत असतील तर ती त्यांची चूक आहे. ती चूक निदान आपण तरी करतां कामा नये.

१०. पाकिस्तानमध्यें आतां एक नवा विचारप्रवाह असा वाहूं लागला आहे कीं सत्तागटांत सामील होण्यापेक्षां न होण्यांत फायदा अधिक आहे.

---

अनुक्रमणिका








प्रा. भालचंद्र शंकर भणगे

# गोवामुक्ति : कांहीं आक्षेपांचा विचार

भारतसरकारनें लष्कर पाठवून गोवें ताब्यांत घेतल्या-पासून लोकांमध्यें बरीच चर्चा चालू आहे. वादांतील अभिनिवेश कमी झाल्यावर आतां शांत मनानें ही चर्चा करतां येईल.

## वसाहत कीं अंगभूत भाग ?

गोवा भारतांत सामील व्हावयास हवा होता असेंच सर्वसंमत मत आहे. अपवाद एकच, सालाझार ह्याचा ! सालाझार अंशतः झार आहे. ह्या विधानांत मी केवळ शाब्दिक खेळ करीत नाहीं. झारशाही जितकी जुनाट ठरली होती तितकीच सालाझारची विचारसरणी जुनाट आहे. गोवें ही पोर्तुगालची वसाहत होती असें 'युनो'मधील पोर्तुगालचे मित्रहि मानतात, पण सालाझारचा हट्ट असा कीं ती वसाहत नसून पोर्तुगालचा भाग होता. ( पूर्व आणि पश्चिम पाकिस्तान हे जसे दोन भाग आहेत तसे ! ). या म्हणण्यास आधार तरी काय ? गोवें आणि पोर्तुगाल संलग्न नाहींत; गोव्याची जनता आणि पोर्तुगालची जनता एका भाषेची नाहीं, एका धर्माची नाहीं, एका वंशाची नाहीं, कीं एका वर्णाची नाहीं. गोवें आणि पोर्तुगाल ह्यांची संस्कृती एक नाहीं; गोवें आणि पोर्तुगाल ह्यांचा इतिहास एक नाहीं. सालाझारच्या म्हणण्यास आधार एवढाच कीं त्यानें कांहीं वर्षांपूर्वी पोर्तुगालची नवी राज्यघटना तयार करून त्यांत गोव्याला 'सागरापलीकडचा प्रांत' असें नांव दिलें !

साडेचारशें वर्षें गोवें पोर्तुगीजांकडे आहे, त्यामुळें गोव्यावर पोर्तुगीजांची कांहीं छाप अपरिहार्यपणें पडली. गोव्याच्या भाषेवर परिणाम झाले, चालचलणुकीवर परिणाम झाले, संस्कृतीवर परिणाम झाले, आर्थिक संघटनेवर परिणाम झाले. हे परिणाम बरे कीं वाईट हा प्रश्न नसून, ह्या परिणामांमुळें गोवें पोर्तुगालचा भाग मानतां येईल काय, असा येथें प्रश्न आहे. साडेचारशें वर्षें गोवें अंकित असल्यामुळें हे परिणाम अपरिहार्य होते, पण त्यामुळें गोव्याची अंकितता राजकीय विचारसरणींत समर्थनीय ठरत नाहीं.

## सार्वभौमत्वाचा प्रश्न

ह्या ठिकाणीं दुसरा एक मुद्दा मांडला पाहिजे : तो सार्वभौमत्वाविषयीं. वसाहतीवर पितृदेशाचें सार्वभौमत्व असतें काय ? भारतसरकार पोर्तुगालचें गोव्यावरील सार्वभौमत्व मानीत नाहीं[१] तरी पाश्चिमात्य देश मानतात. हा भेद सार्वभौमत्वाची व्याख्या कशी करावी त्याबद्दलच्या अनिश्चितींतून उद्भवला आहे. ह्या मुद्याचा भारताची गोवा–कारवाई ही आक्रमण ( aggression ) आहे कीं नाहीं ह्या वादाशीं संबंध आहे. पोर्तुगालचें गोव्यावर सार्वभौमत्व असलें तर भारतानें आक्रमण केलें असें म्हणावें लागेल. सार्वभौमत्व हा शब्द न वापरतां गोवें ही वसाहत होती कीं पोर्तुगालचा प्रांत होता, अशा रीतीनें गोव्याचा प्रश्न मांडला तर शब्दांनीं माजणारा विचारांचा गोंधळ टळेल.

---

१. भारताचे युनोवरील कायमचे प्रतिनिधि श्री. झा ह्यांनीं आपल्या भाषणांत ह्याच मुद्यावर विशेष जोर दिला आहे. ते म्हणतात : " There can be no question of aggression against your own people, whom you want to bring into freedom.

That is the situation we want to face If any narrow-minded, legalistic considerations -- considerations arising from international law as written by European law writers -- should arise, those writers were, after all, brought up in atmosphere of colonialism. I pay all respect to Grotius, who is supposed to be the father of international law, and we accept many tenets of international law ... But the tenet which says, and which is quoted in support of colonial powers having sovereign rights over territories which they won by conquest in Asia and Africa is no longer acceptable. It is the European concept and it must die : It is time, in the twentieth century, that it died. "

## गोवाकारवाईची अप्रस्तुत तुलना

श्रीयुत एन्. दांडेकर यांनीं गोवाकारवाईची जर्मनीनें पोलंड घेतला किंवा रशियानें हंगेरीवर आक्रमण केलें, ह्या घटनांशीं तुलना केली आहे ! सालाझारचा विचार दांडेकर यांनीं कसा मांडला ? दांडेकर यांच्या हेतूविषयीं कोणी शंका घेणार नाहीं, मग त्यानीं सालाझारसारखा विचार कसा मांडला ? पोलंड आणि हंगेरी हीं सार्वभौम राष्ट्रें होतीं. जर्मनी आणि रशिया यांनीं सार्वभौम राष्ट्रांवर आक्रमण केलें. गोवा हें राष्ट्र नव्हे. त्यामुळें गोवें घेणें आणि पोलंड किंवा हंगेरी घेणें ह्यांत साम्य नाहीं. गोवें घेण्यांत पोर्तुगालच्या सार्वभौमत्वावर आक्रमण होतें असें म्हणतां येईल, पण त्याबाबतींत मागील परिच्छेदांत सांगितलेला विचारांतला गोंधळ अभिप्रेत आहे. श्री. दांडेकर ह्यांच्या विचारांत असा गोंधळ आहे हें मान्य नसेल तर त्यांच्या 'स्वतंत्र पक्षा'च्या अभिनिवेशानें त्यानीं सरकारला बदनाम करण्याचा हा प्रयत्न केला आहे असें म्हणण्यावाचून गत्यंतर राहात नाहीं. वस्तुस्थिति अशी कीं गोवें हा भारताचा भाग होता. तो पोर्तुगालचा भाग नसून, ती पोर्तुगालची वसाहत होती. वसाहती मूळ देशांकडे जाव्या हें आजचें सर्वमान्य तत्त्व असल्यामुळें, गोवें भारतांत सामील होणें अगदीं योग्य. ही सामीलीकरणाची तुलना जर्मनीनें पोलंड जिंकणें किंवा रशियानें हंगेरी टांचेखालीं घालणें ह्या घटनांशीं करणें गैरवाजवी होय.

## लष्करी कारवाई आणि गांधीवाद

पुढचा विचार असा कीं भारताने गोव्यांत लष्कर पाठविलें हें बरें केलें का ? कोणत्याहि देशानें दंडबल वापरावें काय ? गांधीजींच्या नेतृत्वावर हक्क सांगणाऱ्या भारतानें फौजेचा उपयोग करावा काय ? शांतिदूत नेहरूंच्या भारतानें लष्करी कारवाई करावी काय ? पहिल्या प्रश्नाचें उत्तर नंतरच्या तीन उपप्रश्नांवर अवलंबून राहील.

भारतानें सैन्य पाठवून गोवें घेतलें त्याचा विषाद वाटावा, पण शरम वाटण्याचें कांहींच कारण नाहीं. जसे व्यक्तींमधले तसे देशांमधले तंटे वाटाघाटींनें मिटविणें हें सदैव योग्य होय. भारताची तशी ठाम श्रद्धा आहे. ह्या श्रद्धेमुळेंच भारतानें युनोमध्यें सदैव शांतिमार्गाचा पुरस्कार केला. पण वाटाघाटींचा किंवा शांततेचा मार्ग म्हणजे अन्याय सहन करणें नव्हे. अन्यायाचें निराकरण व्हावें म्हणून जरूर दम धरावा, पण त्यालाहि मर्यादा आहे. तशी मर्यादा आहे हें आपण विसरलों तर अन्यायांत आपण वांटेकरी झालों असें होईल. गोव्याचा प्रश्न सामोपचारानें सुटावा म्हणून गेलीं पंधरा वर्षें– विशेषतः गेलें एक वर्ष– भारतानें आणि त्रयस्थ देशांनीं प्रयत्न करूनहि त्यांना यश मिळालें नाहीं. न्यायासाठीं हिंसा करणें– ती अपरिहार्य म्हणून करणें– "विनाशाय च दुष्कृताम्–" धर्म होऊन बसतो. ह्या हिंसेचा विषाद मात्र वाटत राहावा. कारण जोंपर्यंत विषाद वाटेल तोंपर्यंत अन्य मार्गांचें श्रेष्ठत्व मनावर राहील.

रावसाहेब पटवर्धन, शंकरराव देव, जयप्रकाश नारायण, यांस गोवेमुक्तीचा आनंद होतो, पण त्यांना वाटतें कीं दंडबलाचा वापर गांधीवादांत बसत नाहीं. आणि म्हणून नेहरूसरकार गांधीवादी नाहीं ! ही टीका कांहींना अप्रासंगिक वाटली. विचारवंतानें प्रसंग पाहून विचार मांडावा असा दंडक घातला तर तें विचारस्वातंत्र्यावरचें एक बंधन ठरेल. किंबहुना, प्रसंग पाहून बोलावें किंवा विचाराची मांडणी करावी किंवा विचार फिरवावा असा प्रघात एवढा वाढला आहे कीं अप्रासंगिकतेचा दोष स्वीकारूनहि विचार सांगावा असें म्हणण्याची पाळी आली आहे ! प्रश्न असा कीं वरील आक्षेपांत सत्य किती ?

गोवें भारतांत यावें अशी गांधींची इच्छा होती ती पुरी झाली असें सरकारतर्फे आरंभीं सांगण्यांत आलें. गांधींच्या नांवाचा येथें असा पहिल्यानें उपयोग करण्यांत आला. गोवें भारतांत यावें अशी गांधींची खरीच इच्छा असल्यामुळें सरकारी विधान बरोबर होतें. पण गांधींच्या नांवाचा सरकार मंत्रासारखा उपयोग करीत असतें त्याप्रमाणें येथें उपयोग करण्यांत आला कीं लष्करी कारवाई गांधींना मान्य झाली असती असें सरकारला सुचवायचें होतें ? गांधींना सैन्याचा वापर गोव्याच्या बाबतींत मान्य झाला असता, या समर्थनाला असा पुरावा देण्यांत येतो कीं काश्मीरमध्यें सैन्य वापरण्यास गांधींनीं विरोध केला नव्हता. शिवाय तात्त्विक दृष्ट्या अन्यायाशीं झगडण्याचा शेवटचा उपाय म्हणून गांधी हिंसेला मान्यता देत.

एक गोष्ट स्पष्ट करावयास हवी कीं गांधींनीं एखादी घटना मान्य केली असती म्हणून ती गांधींवादाशी सुसंगत आहे असें समजूं नये; गांधीवाद हा गांधीं- पेक्षां मोठा आहे आणि गांधींचा शब्द म्हणजे गांधी- वादावरचा शेवटचा शब्द नव्हे! गांधीवादी, गांधी- वादाच्या साहाय्यानें, गांधींचाहि पराभव करूं शक- तील! गोव्याची कारवाई गांधींना पसंत पडली असती तरीसुद्धां ती गांधीवादाशीं सुसंगत आहे काय असा प्रश्न शिल्लक राहूं शकतो.

## गांधीवादाचें तत्त्वज्ञान

गांधींच्या हयातींत देशानें गांधींचें नेतृत्त्व मानलें तें गांधींवाद पटल्यामुळें नव्हे. गांधीवाद हें एक एकजिनसी आणि अभेद्य तत्त्वज्ञान आहे. तें खाजगी जीवन आणि सामाजिक व्यवहार व्यापून टाकतें. त्या तत्त्व- ज्ञानाचें कांहीं व्यक्तींनीं कांहीं काळ आणि कांहींनीं कायमचें पालन केलें. तीं माणसें राजकारणांत अस- तील किंवा नसतील. परंतु सबंध देशानें गांधीवाद मानला तो एक जीवनदृष्टि म्हणून नसून राजकारण म्हणून. त्या राजकारणाला 'निःशस्त्रांचें राजकारण' हा शब्द आकुंचित ठरेल. त्या राजकारणाला स्वतःचा वेगळा दर्जा होता. इतिहास असें सांगतो कीं सामान्यतः समाजानें गांधींचा स्वीकार त्यांच्या राजकारणासाठीं केला, त्यांच्या तत्त्वज्ञानासाठी नाहीं. इतिहासाच्या त्या पर्वांत नुसती राजकारणाची गरज होती, तत्त्व- ज्ञानाचा वापर करण्याची संधि नव्हती. त्यामुळें राजकारण म्हणूनच गांधीमार्गानें जाऊन आपण त्यांची जीवनदृष्टिहि स्वीकारली आहे असा गैरसमज बाळगणें शक्य होतें. इतिहासाचें तें पर्व संपलें; नवीन सुरू झालें. नव्या पर्वांत गांधींच्या राजकारणाची जरूरी वाटली नाहीं. थॉमस पेन ह्याची अमेरिकेच्या क्रांतीस गरज होती तेव्हां त्याचा प्रत्येक शब्द मानला गेला. क्रांति घडून गेल्यावर वाशिंग्टननेंहि त्याला विचारलें नाहीं! गांधींच्या बाबतींत भारतांतहि बरेंचसें असेंच झालें.

गांधींच्या तत्त्वज्ञानांतील कांहीं गोष्टी आम्हीं स्थूल- मानानें जतन करीत आहोंत. उदा. शांततेसाठीं प्रयत्न, मानव्याचें प्रेम आणि समभाव, दुर्बळांचें परित्राण, खेड्यांची सुधारणा, आणि लहान धंद्यांस उत्तेजन. इतर बाबतींत, (उदा० प्रचंड धरण किंवा कारखाना उभारतांना, गल्लोगल्लीं सरकारी जीपगाड्या फिरवि- तांना) आम्हीं कोठें गांधीवादाची उठाठेव करतो? तेहतीस कोटी देव पचवले तसे गांधीहि पचवले असें रावसाहेबांनीं म्हटलें तर इतिहासाचा विद्यार्थी म्हणून त्यांना दोष देतां येत नाहीं.

जयप्रकाशांनीं पुरें ओळखलें आहे कीं आमचा समाज आणि आमचें सरकार गांधीवादावर अधिष्ठित नाहीं. ह्या सरकारनें सैन्यबळावर गोवें घेतलें त्याबद्दल त्यांना आनंद होतो. त्यांचें दुःख वेगळें आहे. तें असें कीं ज्या व्यक्ति गांधीवादी आहेत त्यांनीं आपल्या मार्गानें गोवें मिळविलें नाहीं. त्यांचें दुःख निष्क्रियतेचें किंवा निष्फलतेचें आहे!

## कारवाईचें बलवत्तर कारण

एक परकी सत्ता ह्या देशाच्या पोटांत राहणें हें देशाला सुरक्षिततेचें नाहीं, परकी सत्तेखालील माणसें परकी नसून आमचींच होतीं, आणि पंधरा वर्षें वाटा- घाटीच्या मार्गानें जाऊन प्रश्न सुटला नाहीं हीं कारणें लष्करी कारवाईच्या समर्थनार्थ पुरेशीं आहेत.

गांधीवादाचा घोळ घालूं नये, त्याचप्रमाणें गोव्यां- तील पोर्तुगीज सैनिकांनीं भारतीय कोळी मारला किंवा त्या सैनिकांनीं कांहीं मैल भारतांत प्रवेश केला हीं कारणें लष्करी कारवाईचें समर्थन करण्यास वापरण्याचें कारण नाहीं. लष्करी कारवाई साधारणतः अमुक दिवशीं कां झाली तें सांगण्यासाठीं तत्कालीन घटनांचा उपयोग होईल. अशा घटनांना किती महत्त्व द्यावयाचें त्यावरून राष्ट्राचें राजकारणांतील प्रौढत्व ओळखलें जातें. ह्या घटनांमुळें भारतसरकारला गोवाकारवाई करावी लागली असें म्हणणें हा सरकारचा आणि कार- वाईच्या उद्दिष्टांचा उपमर्द आहे.

## गोवा कारवाई आणि युनो

भारताला स्वतःचें असें आंतरराष्ट्रीय मानाचें स्थान आहे. पूर्वेकडील इतर देशांपेक्षां भारताच्या शब्दाला यूनोमध्यें महत्त्व आहे. असें महत्त्व असणें भारताच्या दृष्टीनें फायद्याचें आहेच. भारताच्या शब्दाचा, आणि मध्यस्थीचा इतर देशांत उपयोग होत असे. गोवा- कारवाईनें भारताचें हें स्थान गेलें काय? हें स्थान गेल्यामुळें हानि झाली काय?





अनुक्रमणिका

## गोवामुक्ति : कांहीं आक्षेपांचा विचार

भारताचें परदेशांतील महत्त्व एकाद्याच गोष्टीवर अवलंबून नाहीं. अनेक गोष्टींच्या समुच्चयावर तें अवलंबून आहे. त्या गोष्टी साधारणतः अशा आहेत असें वाटतें. ह्या देशाचा विस्तार आणि लोकसंख्या; परंपरा; आजची सांस्कृतिक पातळी; लोकशाहीचें यश; विकासाचे सतत प्रयत्न; राजकीय स्थैर्य; आंतरराष्ट्रीय बाबतींत सहजीवनावरील विश्वास आणि तटस्थता; आशियामधील नेतृत्व; पूर्वींच्या आणि विद्यमान पुढाऱ्यांची महात्मता; आणि जागतिक शांततेसाठीं प्रयत्न. ह्यापैकीं एखाद्या बाबतींत भारत मागें राहिला तर भारताचें स्थान तत्क्षणीं नष्ट झालें असें समजणें चुकीचें ठरेल. हें मात्र खरें कीं वरीलपैकीं प्रत्येक गोष्ट अतिशय मोलाची आहे. तिची अतिशय कसोशीनें जपणूक केली पाहिजे.

### जागतिक शांततेच्या मर्यादा

भारत जागतिक शांततेसाठीं प्रयत्न करतो ह्या गोष्टीचा येथें अधिक विचार करूं. जागतिक शांततेसाठीं प्रयत्न करतांना त्यांत ज्या मार्गानें विग्रह मिटवायचे त्याचा जरूर अंतर्भाव होतो. युद्ध टाळणें हा तो मार्ग. युद्ध टाळावें ह्याचा अर्थ तें कोणत्याहि परिस्थितींत टाळावें असें नव्हे. अन्यायाचें परिमार्जन करण्यासाठीं युद्धावाचून मार्ग राहिला नाहीं अशी परिस्थिति निर्माण झाली तर युद्धाचा अवलंब करावाच लागतो. अन्याय आणि युद्ध ह्यापेक्षां युद्ध हेंच शांततेसाठीं आवश्यक ठरतें! कोरियांत आणि कांगोमध्यें युनोतर्फे युद्ध पुकारावें लागलें. चीननें भारताचा सीमेवरील कांहीं प्रदेश बळकावला तरी भारतानें चीनविरुद्ध युद्ध पुकारलें नाहीं असा आरोप भारताचे अमेरिकी टीकाकार करतातच ना?

युद्धायुद्धांत फरक करावयास हवा: न्यायासाठीं किंवा अपरिहार्य युद्ध असा एक प्रकार. अन्याय करणारें किंवा टाळतां आलें असतें असें युद्ध हा दुसरा प्रकार. पहिला प्रकार समर्थनीय आहे, पण हें युद्ध न्यायासाठीं आहे किंवा अपरिहार्य आहे हें ठरवायचें कोणी? ज्या त्या राष्ट्रानें ठरवायचें असें म्हटलें तर प्रत्येक युद्ध न्यायासाठीं आणि अपरिहार्य म्हटलें जाईल. न्याय आणि अपरिहार्यता ठरविण्याची जबाबदारी युनोवर टाकावी. युनोच्या ध्येयधोरणाप्रमाणें युनोनें ही जबाबदारी उचलली आहे. पण ती जबाबदारी पार पाडतांना युनोला यश येतें कीं अपयश येतें?

युनोनें गोवें ही वसाहत मानून जी माहिती मागविली ती पोर्तुगालनें दिली नाहीं. युनोचे सदस्व असणाऱ्या कांहीं देशांनीं पोर्तुगालला वाटाघाटींची भीड घातली तरी पोर्तुगालनें ऐकलें नाहीं. अंगोला, आणि आल्जिरिया येथील हत्याकांडासंबंधीं युनो अपयशी ठरली. कांगोमधील युनोची कारवाई दुर्बळ ठरली. ह्या उदाहरणांचा अर्थ असा कीं युनोच्या प्रमुख सदस्यांत वसाहतींवर होणाऱ्या अन्यायाविषयीं अनुकंपा असली तरी त्या भावनेनें प्रेरित होऊन स्पष्ट निणय घण्याइतकी किंवा निर्णयाप्रमाणें कार्य करण्याइतकी त्यांना अन्यायाची चीड येत नाहीं. अशा परिस्थितींत युनोवर हवाला टाकून, "नातिचरामि" अशा शपथेनें एखाद्या देशानें किती काळ अन्याय सहन करीत बसावें?

### युनोंतील पंक्तिप्रपंच

काळे आणि गोरे असा फरक पडतो तो येथें. वसाहत बनलेले देश काळ्या लोकांचे आहेत तर वसाहतीवर कबजा असणारे लोक गोरे आहेत. पुढारलेलीं आणि मागासलेलीं राष्ट्रें हा फरकसुद्धा येथें दिसतो. युनोच्या सिक्युरिटी कौन्सिलमध्यें पुढारलेल्या देशांचें प्राबल्य, तर आमसभेंत नव्या आणि मागासलेल्या देशांचें संख्याबल जास्त. भारतानें गोव्यावरील कारवाई केल्यानंतर काळे-गोरे असा भेद आणि सिक्युरिटी कौन्सिलचें आणि आमसभेचें मत असा जो भेद दिसून आला त्यावरून युनोची प्रकृति काय आहे तें चटकन् लक्षांत येतें आणि आजच्या परिस्थितींत युनोवर संपूर्ण भरंवसा टाकणें न्यायाला पूरक नाहीं असें वाटतें!

वसाहतवाद आणि कम्युनिझम ह्यांकडे युनोमधील प्रबल राष्ट्रें कसें पाहातात त्यावरून सुद्धां युनोचें स्वरूप कळतें. वसाहतवाद काळ्या लोकांना जास्त भोंवला आहे, तर गोऱ्या देशांना कम्युनिझमची भीति अधिक वाटते. इंग्लंड, अमेरिका, फ्रान्स, पश्चिम जर्मनी; ऑस्ट्रेलिया, दक्षिण आफ्रिका हे देश कम्युनिझमशी युद्ध हें पाक मानतात तर वसाहतवादाविरुद्ध युद्ध झालें तर त्यावर टीका करतात. कम्युनिस्ट कॅस्ट्रोच्या

क्युबावर बॉम्बफेक करतांना केनेडी सरकारास चूक वाटत नाहीं पण भारतानें पोर्तुगालच्या वसाहतीवर सैन्य पाठविलें तर अदलाई स्टीवन्सन जळफळाट करतात ! सुएज कालव्यावरील हक्कांचें संरक्षण करण्यास इंग्लंडचें सैन्य जातें, मात्र भारतानें आपलें गोवें घेण्यासाठीं सैन्य पाठविणें निषिद्ध ! मॅक्‌मिलनने 'युरोपच्या बाजारां'त सहभागी व्हावें, आणि बाहेरच्या माणसांनीं देशांत येण्यावर निर्बंध घालण्याचा कायदा करावा. त्यावेळी भारतासारख्या देशाला हें धोरण किती बाधेल ह्याचा विचार नसतो, पण भारतानें गोवें मात्र मॅकमिलनच्या सल्ल्यावाचून घेऊं नये !

## 'युनो'च्या सनदेचा भंग ?

युनोचें स्वरूप असें असलें, आणि त्यामुळें युनोवरच भरंवसा टाकून अन्याय दूर होणार नसला तरी भारतानें सैन्य वापरून युनोच्या चार्टरचा भंग घडला हें प्रचलित अर्थानें खरें आहे. भारतानें पोर्तुगिजांविरुद्ध सैन्य वापरलें ह्या अर्थानें चार्टरचा भंग घडला ! पोर्तुगालचें गोव्यावर सार्वभौमत्व नव्हतें एवढेंच आम्हीं उत्तरादाखल म्हणूं शकतों. गोवें कोणाचें ? गोवें दुसऱ्या मार्गानें घेतां आलें असतें काय ? ह्या दोन्ही प्रश्नांचीं उत्तरें ह्या लेखांत ज्या पद्धतीनें दिलीं आहेत त्यावरून गोवा-कारवाई नैतिकदृष्ट्या समर्थनीय ठरते. पण प्रचलित अर्थानें युनोचार्टरचा भंग झाला असेंहि म्हणावें लागतें. नैतिक भूमिका आणि कायद्याची भूमिका परस्परविरुद्ध असल्यामुळें भारताची अवस्था केविलवाणी झाली. "We sympathise with the Indians" असें जें 'न्यू स्टेट्‌स्मन्'नें म्हटलें तें ह्या अर्थानें खरें आहे.

भारतानें यश मिळविलें तरी त्याची कींव करावी लागते ही यूनोच्या अपयशाची खूण आहे. वसाहतींना स्वातंत्र्य मिळावें हें युनोचें अधिकृत मत[२] असतांहि स्वातंत्र्य मिळवून देण्याचा वैध मार्ग युनोला अजून सांपडूं नये ? सतत शांततेच्या आणि वैध मार्गानें जाणाऱ्या, युनोची कार्यपद्धति आणि प्रतिष्ठा ह्यासाठीं सतत प्रयत्न करणाऱ्या, भारतावर युनोमधील ही विसंगति दाखविण्याची पाळी यावी ? भारतानें आपण दुटप्पी आणि दुहेरी आहोंत कीं काय त्याचा विचार करण्यापेक्षां युनोनें विचार करावा : "आपणच भारतावर ही पाळी आणली नाहीं काय ? इतरांवरहि ही पाळी न येण्यासाठीं आपण काय करावें ?"

## गोव्याचा कारभार

गोवें भारतांत सामील झाल्यावर तेथील व्यवस्थेसंबंधीं काळजीपूर्वक विचार झाला पाहिजे. गोव्याच्या लोकांच्या खास भावना आहेत, त्यांचे खास प्रश्न आहेत. त्यांचा विचार झाला पाहिजे. केवळ भावनिक ऐक्यासाठीं नव्हे, तर गोवें घेण्यामध्यें गोवेंकरांना आम्हीं न्याय दिला, त्यांना विकासाची संधि दिली, हें सिद्ध करण्यासाठीं.

गोवेंकर प्रत्येक दृष्टीनें भारतीय आहेत ह्यांत किमपि शंका नसली तरी साडेचारशें वर्षांच्या ताटातुटीनें त्यांच्यांत एक वेगळेपणा आला आहे ह्याबद्दलहि शंका नसावी. गोव्याच्या कोंकणी भाषेंत जसे कांहीं पोर्तुगीज आणि फ्रेंच शब्द आहेत त्याप्रमाणें गोवेकरांच्या राहणीवरहि पोर्तुगीजांचा किंवा युरोपचा कांहीं संस्कार झाला आहे. उदा० त्यांना चांगल्या कपड्यांची, अत्तरांची, सौंदर्यप्रसाधनांची आवड आहे. ह्या वस्तूंची आयात एकदम थांबवून चालण्यासारखें नाहीं. खिश्चन आणि उच्च वर्गीय हिंदूंना नाच-गाण्याचा शोक आहे. त्यांचें क्लबमधलें वागणें लगेच बदलेल अशी अपेक्षा करूं नये.

वेगळेपणा जसा पोर्तुगीजांच्या सान्निध्यानें आला त्याप्रमाणें गोवेंकरांच्या मळ संस्था अजून टिकून आहेत त्यामुळेंहि आहे. गोव्यांत ग्रामसंस्था अजून टिकून आहे. गोव्यांतील हिंदूंमध्यें धर्माच्या, देवाच्या, आणि सामाजिक चालीरीतीच्या जुन्या कल्पना फार आहेत. छानछोकीची हौस सोडली तर गोवेंकर हिंदू घरीं अतिशय साधेपणानें राहतात. जत्रा, देवळांतील उत्सव आणि सण हेच हिंदु कुटुंबांतील स्त्रियांना घरांतून बाहेर डोकावण्याचे प्रसंग असतात. नवी राजवट सुरू झाल्यावर, नवीं माणसें बाहेरून तेथें जाऊन राहातील आणि आधुनिकतेचा गोवेंकरांवर मारा चालू होईल तर तें गोवेंकरांना आवडणार नाहीं. आवडलें तर त्यांतून त्या समाजाची मोठी विकृति होईल. छानछोकीची थोडीशी आवड असणारा, क्लबमधलें

२. पंधराव्या परिषदेंतील १५१४ वा ठराव : "Immediate steps shall be taken, in trust and non-self-governing territories to transfer all powers".



अनुक्रमणिका






जीवन दुरून पाहिलेला, सामान्य हिंदू त्याच्या सनातन कल्पनांतून एकदम बाहेर पडला तर त्याचा तोल सुटल्यावाचून राहणार नाहीं.

गोव्यांतलें आयुष्य जसें संथ होतें तसें तें साधें होतें. उद्योगधंदे फार नाहींत आणि एकदरींत लोकांचा स्वभाव सौम्य. त्यामुळें सामाजिक व्यवहारांत मोठी चळवळ दिसत नसे; साधेपणा आला होता. सरकारी व्यवहार अगदीं कमी. कर कमी, नियम कमी. कामकाजांत कागदपत्रांचें दळणवळण कमी. एखाद्या मोठ्या अधिकाऱ्याच्या कानीं घातलें म्हणजे काम व्हायचें. कदाचित् तोच अधिकारी काम झालें म्हणून येऊन सांगायचा. नवी राजवट सुरू झाल्यावर गुंतागुंत निर्माण होणार. अनेक कायदे, कर आणि अधिकारी ह्यामुळें गोवेंकरांना त्रास वाटेल. आपण जें सरकार म्हणून ओळखतों तसें सरकार गोवेंकरांना फारसें माहीत नाहीं. गोव्याच्या पोलिसाचीं कर्तव्यें किती साधीं होतीं त्यावरून सरकार किती साधें होतें त्याची कल्पना येईल. अशा पार्श्वभूमीवर आमच्या अर्थानें सरकार सुरू झाल्यावर गोवेंकर भांबावले किंवा त्रासले तर नवल नाहीं. हें लक्षांत घेऊन सरकार किंवा सत्ता वाढविण्याचें काम सबुरीनें झालें पाहिजे.

गोव्याच्या सर्वांगीण विकासांत गोवेंकरांना अग्रहक्क मिळावा. आज मराठवाड्यांत मुंबईपुण्याकडील माणसांविषयीं जी किंचित् वैषम्याची भावना निर्माण झाली आहे किंवा कांहीं जुन्या संस्थानांत विलीनीकरणानंतर जी अढी निर्माण झाली आहे त्यापेक्षां अनेक पटींनीं ती गोव्यांत निर्माण होईल असा धोका दिसतो आहे. गोव्यांतील वेगळेपणा मराठवाड्यांतील किंवा संस्थानांतील वेगळेपणापेक्षां अधिक. जुनी राजवट आणि नवी ह्यामध्यें तुलना होण्याची शक्यताहि अधिक. बाहेरचे लोक लगेच गोव्यांत गेले तर गोवकर ' स्वदेशी वसाहतवादा 'बद्दल तक्रार करतील. किंबहुना, थोडीशी तक्रार सुरू झालीच आहे. बँकांसारखे धंदे सोडले तर इतर धंद्यांसाठीं बाहेरच्या लोकांनीं तेथील धंद्यांच्या शाखा गोव्यांत उघडावयासच हव्या असें नाहीं. स्थानिक लोक खाणीचा धंदा काढतात तसे इतर धंदे काढतील, जशी आयात करीत तशी निर्यात करतलि, जशा शाळा काढीत तशीं कॉलेजें काढतील, जशा नाटकमंडळ्या काढीत त्याप्रमाणें सिनेमागृहें उभारतील आणि जशीं साप्ताहिकें काढीत त्याप्रमाणें दैनिकें काढतील. गोव्यांतील बरींच माणसें केवळ कलावंत म्हणून नव्हेत, तर विद्वान् ; संशोधक, प्राध्यापक, धंद्यांमधील अधिकारी आणि सरकारी अधिकारी म्हणून गाजत आहेत. बाहेरून कांहीं भांडवल मिळालें तर गोवेंकर आपल्या कर्तृत्वावर त्या प्रदेशाचा विकास थोडक्या काळांत साधतील.

गोव्याच्या नव्या राजवटीपुढील जबाबदारी अशी अवघड आहे. गोव्यांत " गोंयभायली वागणूक " नसावी हें ब्रीद ह्या राजवटीनें ठेवावें.

---





अनुक्रमणिका








प्रा. मधुसागर वा. बेलगे

# भारतीय उद्योगांतील विदेशी भांडवल व भागीदारी

भारतांतील उद्योगांत हल्ली मोठ्या प्रमाणावर विदेशी भांडवलाची गुंतवणूक होत आहे. अर्थात् ह्या विदेशी भांडवलाकडे व तज्जन्य भागीदारीकडे साशंक दृष्टीनें पाहण्यांत येत आहे. सरकारी क्षेत्रांत विदेशी भांडवलाचा ओघ वाढत्या प्रमाणावर दिसून येतो. तीच गोष्ट खाजगी क्षेत्रांतील उद्योगाबाबतहि आढळून येते. विदेशी भांडवलाचा ओघ खालील प्रकारांत भारतांत आलेला दिसतो—

( १ ) औद्योगिक उपक्रमासाठीं खाजगी अथवा सरकारी क्षेत्रांत येणारें विदेशी भांडवल.

( २ ) विदेशांत स्थापन झालेल्या कंपन्यांकडून भारतांतील त्यांच्या शाखेंत उद्योगाच्या अर्थप्रबंधनासाठीं आलेलें भांडवल.

( ३ ) भारतांतील उद्योगपतींनी विदेशांत उभारलेलें भांडवल किंवा विदेशांतील लोकांनीं विकत घेतलेले भारतीय शेअर्स.

( ४ ) देशी व विदेशी उद्योगधंद्यांतील संयुक्त उपक्रम व हातमिळवणी.

( ५ ) विदेशांतून भारतीय सरकारी किंवा खाजगी क्षेत्रांत घेतलेली तंत्रज्ञांची सेवा.

( ६ ) आंतरराष्ट्रीय कोष ( International Monetary Fund ) व जागतिक बँकेने खाजगी व सरकारी क्षेत्रांतील उद्योगांस केलेलें आर्थिक साहाय्य.

पहिल्या पंचवार्षिक योजनेच्या प्रारंभापासून सरकारी क्षेत्रांतील उद्योगधंद्याची वाढ व प्रगति करण्यासंबधीचें सरकारी धोरण जाहीर आहे. तदनुसार बंगलोर येथील हिंदुस्थान मशीन टूल्सचा कारखाना आणि पेरंबूर येथील रेल्वेचे डबे तयार करण्याचा कारखाना इन्डो–स्वीस टेक्नीकल कोऑपरेशन[1] स्वीडीश सरकारच्या मदतीने स्थापन करण्यांत आले आहेत. रशियन सरकारच्या मदतीने बांधण्यांत आलेला भिलाई येथील लोखंडी कारखाना, तसेंच दुर्गापूर व राऊलकेला या ठिकाणीं ब्रिटिश सरकार व डेमग् ह्या जर्मन कंपनीने स्थापन केलेले लोखंडाचे व पोलादाचे कारखाने, ब्रिटिश सरकारच्या आर्थिक साहाय्याने स्थापिलेला भोपाळ येथील इलेक्ट्रिक् प्लँट आणि नव्यानेंच नोंद झालेली ' ऑईल इन्डिया कंपनी ' हीं विदेशी भांडवल व भागीदारीचीं सरकारी क्षेत्रांतील उत्कृष्ट उदाहरणें होत. याशिवाय खाजगी क्षेत्रांतहि जागतिक संस्था उत्साहाने भारताच्या औद्योगीकरणास मदत करीत आहेत. बर्नपूर येथील हिंदुस्थान लोह व पोलाद कारखान्यास जागतिक बँकेने दिलेलें १ कोट डॉलरचें कर्ज तसेंच ट्राम्बे इलेक्ट्रिक प्रोजेक्टसाठीं टाटा कंपनीस दिलेलें १·४ कोटी डॉलरचें कर्ज, कोलंबो प्लॅन अंतर्गत ' ब्रिटिश कुटुंबा'तील राष्ट्रांना मिळणारी आर्थिक मदत व ' पॉईंट–फोर' या सदराखाली अमेरिकेकडून उपलब्ध होत असलेलें आर्थिक साहाय्य, हीं विदेशांतील भांडवली ओघाचीं

---

१. हिंदुस्थान मशीन टूल्सच्या कारखान्यावर जो ९.७८ कोटी रुपयांचा खर्च करण्यांत आला त्यापैकी १५ टक्के रक्कम इन्डोस्वीस टेक्नीकल कोऑपरेशनने दिली आहे.












आपणास पूर्णपणें कल्पना देणारीं उपयुक्त अशीं उदाहरणें आहेत.

विदेशी कंपन्यांतर्फे भारतीय धंद्यांतहिं भांडवल मोठ्या प्रमाणावर आयात केलेलें दिसून येतें. या कंपन्यांनीच भारतीय आयात व निर्यात करणारे धंदे अनुक्रमें २८ व ३० टक्के या प्रमाणांत नियंत्रित केले आहेत. १९५३ मध्यें अशा कंपन्यांची संख्या ३४७ होती. पुढें १९५५ मध्यें ती ९०० पर्यंत वाढली व १९६० मध्ये १२०० पर्यंत तिनें मजल गाठली. यांपैकी जवळजवळ १०० कंपन्या अमेरिकन आहेत.

### भारतांतील बचतीचा प्रश्न

भारत सरकारचा देशांतील व विदेशांतील कर्जाचा आंकडा ५००० कोटी[२] रुपयांपर्यंत गेला आहे. हा कर्जबाजारीपणा कितपत वाढविणें योग्य आहे हा एक महत्त्वाचा आर्थिक प्रश्न आहे. मोठ्या प्रमाणावर विदेशी भांडवलाची आयात करावी किंवा नाही याविषयीं अनेक विचार मांडले जातात. कांहींच्या मतें विदेशी भांडवल व विदेशी सरकारांशी उद्योगाबाबत केलेली हातमिळवणी, राजकीय दृष्टिकोनांतून नापसंत केली जाते. अर्थाबरोबर अनर्थ घडेल व राजकीय मदतींतून परकें राज्य येईल. देशाचें स्वातंत्र्य धोक्यांत आणलें जाईल, अशी साधार शंका व्यक्त केली जाते. या विचारांत बऱ्याच अंशीं तथ्य असलें तरी विदेशी भांडवल व आर्थिक सहाय्य मुळींच घेऊं नये ही विचारसरणी आर्थिक दृष्ट्या तरी प्रतिगामी मानली जाते. कारण जगांतील प्रमुख राष्ट्रांनीं आपल्या औद्योगीकरणाच्या संक्रमण-काळांत विदेशांतून आर्थिक मदत घेतल्याचीं उदाहरणें आहेत. खुद्द रशियन सरकारनें देखील क्रांतीनंतर जर्मनीकडून मदत घेतली होती. भारत तर बोलून चालून अर्धविकसित राष्ट्र; त्यामुळें औद्योगीकरणासाठीं त्याला लागणारी भांडवल-निर्मिति ही सुद्धां बेताचीच असणार. त्यामुळें विदेशी भांडवलाची आपणांस कांस धरणें भाग पडतें.

युनायटेड नेशन्सच्या अहवालांतें भारतांतील भांडवलनिर्मितीचें प्रमाण कमी आहे व त्याकरितां विदेशी भांडवल आयात करण्यासाठी अनुकूल वातावरण भारतांत असावें अशी शिफारस केली आहे खाली दिलेल्या आंकड्यावरून भांडवलनिर्मितीचें प्रमाण कसें तोकडें आहे तें आढळून येईल ––

### भारतांतील भांडवलनिर्मिती[५]

| क्षेत्र | शेंकडा प्रमाण |
|---|---|
| १. सरकारी क्षेत्रांतील | ९·७ |
| २. कंपन्याकडून | ३५·८ |
| ३. खेडे विभागांतील | २·६ |
| ४. शहर विभागांतील | १४·१ |
| ५. घरगुती ( Household Sector ) | ५·८ |

वरील तक्त्यावरून हें स्पष्ट होतें कीं भारतांतील एकूण राष्ट्रीय उत्पन्ना- (National income ) च्या केवळ ७·१ टक्के भांडवल येथें तयार होतें. ऑर्थर लेवीस या अर्थशास्त्रज्ञानें औद्योगीकरणासाठीं भांडवलनिर्मितीचें किमान प्रमाण १५ ते २० टक्के पाहिजे असें आपलें मत दिलें आहे.[६] जपानमध्यें हा दर औद्योगीकरणाच्या काळांत ५० टक्के होता !

२. वॉल्टेर येथील कॉमर्स कॉन्फरन्सच्या अध्यक्षीय भाषणांत श्री. रुइया यांनी दिलेला आंकडा (२७–१२–६१)

३. Problem of Capital Formation in the Underdeveloped Countries– By R. Nursky.

४. World Economic Survey, 1960. – U. N. O. Report.

५. Commerce 16 th Sept. 1961.

६. Principles of planning – A. Lewis.



अनुक्रमणिका






## पंचवार्षिक योजना व विदेशी साहाय्य

आपल्या योजनांची भिस्त विदेशी साहाय्यावर कशी अवलंबून आहे हें आतां नव्याने सांगण्याची आवश्यकता नाहीं. पहिल्या योजनेंत २९६ कोटी रु. चीं कर्जें व अनुदानें विदेशांतून आपणास प्राप्त झालीं होतीं. यापैकीं अंदाजें १०८ कोटी रु. दुसऱ्या योजनेंत हस्तांतरित करण्यांत आले व बाकीच्या १८८ कोटी रु. चा उपयोग पहिल्या योजनेंत करण्यांत आला. अमेरिकन सरकारच्या 'व्हीट-लोन' पैकीं ९० कोट रु., 'इन्डो-अमेरिकन एड' पैकीं ३९ कोट रु. व जागतिक बॅंकेकडून उपलब्ध झालेले १३ कोटी रु. असे १४२ कोटी रु. चे वर मदत म्हणून पहिल्या योजनेंत आपणांस मिळाली. पुढील आंकड्यावरून ह्या मदतीची कल्पना येऊं शकेल.

| | रक्कम (कोटी रुपयांत) |
|---|---|
| १. इन्डो अमेरिकन एड प्रोग्राम | १०२·५ |
| २. कोलंबो योजना | |
| (अ) इंग्लंड (१११० तंत्रज्ञांच्या शिक्षणार्थ) | १०१·० |
| (ब) कॅनडा | ३२·३४ |
| (क) ऑस्ट्रेलिया | ११·०४ |
| (ड) न्यूझीलंड | १·०७ |
| ३. फोर्ड फाऊंडेशन | ५·०६ |
| ४. भारत-स्वीडन प्रोग्राम | ·६६ |

द्वितीय पंचवार्षिक योजनेवर १९६० कोटी रु. खर्च होणार होते. यापैकी १३९ कोट रु. म्हणजे संपूर्ण खर्चापैकीं ९·५ टक्के खर्च विदेशी सहाय्याने पार पडणार होता. १९५० ते ६० पर्यंत ९०० कोटी रु. चे वर विदेशी मदत उपलब्ध झाली. रिझर्व बॅंकेनें दिलेला या विदेशी भांडवलाचा तपशील खालीलप्रमाणें आहे.

| पुरविणारे देश | अनुदान कीं कर्ज | रक्कम (कोटी रु. त) |
|---|---|---|
| (१) अमेरिका | अनुदान | ६८ |
| | कर्ज | २४६ |
| (२) जागतिक बॅंक | कर्ज | १३१ |
| (३) सोव्हिएट रशिया | कर्ज | १२३ |
| (४) आंतरराष्ट्रीय कोष | कर्ज | ९५ |
| (५) कॅनडा | अनुदान | १९ |
| | कर्ज | १२ |
| (६) इंग्लंड | | |
| (अ) दुर्गापूर लोहकारखान्यासाठीं २० को.रु. | | |
| (ब) आसाममधील पेट्रोलच्या पाईपकरिता ४ को.रु. | | |
| (क) सामान्य आयातीकरितां ८३·३३ को.रु. | कर्ज | १०७·३३ |
| (७) इतर | अनुदान व कर्ज | ३८ |
| एकूण आर्थिक सहाय्य | | ८३९·३३ |

## खाजगी क्षेत्रांतील औद्योगिक उपक्रम

खाजगी क्षेत्रांत वर्तमानकाळांत एक नवीन प्रकारचें व्यापारी संघटन दिसून येत आहे. भारतांतील प्रसिद्ध उद्योगपति विदेशांतील खाजगी उद्योगपतीशीं संयुक्त उपक्रम करीत आहेत. बिर्ला–न्युफील्ड ही मोटार निर्माण करण्यासाठीं, टाटा–मर्सिडीस बेंझ ही मालवाहू ट्रक तयार करण्यासाठीं, सेन–रॅले ही सायकली तयार करण्यासाठीं, व टाटा–इंपेरियल








केमिकल इन्डस्ट्रीज ही डाय-स्टफ् तयार करण्यासाठीं, झालेलीं औद्योगिक हातमिळविणीचीं काहीं उदाहरणें आहेत. अशा विदेशी भागीदारीचा वेग प्रचंड प्रमाणावर वाढत आहे हें विशेष होय. अमेरिकन खाजगी उद्योगधंद्याशीं झालेली भागीदारीची आंकडे-वारी[७] खालील प्रमाणें आहे.

| | | |
|---|---|---|
| १९५७ — | २४ | संयुक्त उपक्रम |
| १९५८ — | १०९ | ,, ,, |
| १९५९ — | १६२ | ,, ,, |
| १९६० — | ३८८ | ,, ,, |

— इंग्लंडमधील उद्योगपतींशीहि अशीच हातमिळवणी केली जात आहे. १९६० मध्ये ८० संयुक्त उपक्रमाच्या करारांची नोंद झालेली आढळते. ह्या प्रकारच्या उपक्रमामुळें केवळ विदेशी भांडवलच देशांत येत नसून त्याबरोबर तांत्रिक सल्ला व तंत्रज्ञांच्या सेवाहि उपलब्ध होतात. दोन देशांतील हा औद्योगिक करार परिस्थित्यनुरूप ५ ते ६ वर्षांपर्यंतच्या कालावधीचा असतो. तोंवर धंद्याचें नियंत्रण व मार्गदर्शन विदेशी उद्योगपतीमार्फत चालतें. त्यांनी भारतांत मिळविलेला फायदा विदेशांत नेण्याच्या सवलती भारत सरकारकडून देण्यांत येतात. ह्या सोयीमुळें १९६१ च्या पहिल्या तिमाहीत १०१ संयुक्त[८] उपक्रमांच्या करारास सरकारनें मान्यता दिली आहे. या प्रवृत्तीमुळें खाजगी क्षेत्रांत भांडवलाची मोठ्या प्रमाणावर गुंतवणूक होत आहे. उदाहरणार्थ, द्वितीय पंचवार्षिक योजनेंत खाजगी क्षेत्रांत ८५० कोटी रु. ची गुंतवणूक करण्यांत आली. त्यापैकीं १९५९ पर्यंत ४४७ कोट रु. चें विदेशी भांडवल भारतीय उद्योगधंद्यांत गुंतविलें गेलें.

### विदेशी भांडवलास दिलेलीं प्रलोभनें

भारताच्या औद्योगीकरणाचा वेग द्रुतगतीनें वाढविण्याकरितां विदेशी भांडवल भारतांत आकृष्ट करण्यासाठीं सरकारने अनेक प्रकारचीं प्रलोभनें व सवलती दिल्या आहेत. भारत सरकार विदेशी भांडवल आयात करतांना अवास्तव चोखंदळपणा दाखवितें व कित्येक प्रसंगीं विदेशी भांडवलावर प्रतिबंध घालतें अशी टीका जरी केली जाते तरी १९४८ व १९५६ च्या भारत सरकारच्या औद्योगिक धोरणाला अनुसरून, पाहिजे त्या विशिष्ट धंद्यांतच, सरकार विदेशी भांडवल गुंतविण्याची परवानगी देतें. सेलिया हरमनने[९] विशद केल्याप्रमाणे खालील प्रलोभनें भारत सरकारने विदेशी भांडवलास दिलीं आहेत :

१ एप्रिल १९५६च्या पूर्वी भारतांतील उद्योगधंद्यांत असलेल्या विदेशी भांडवलावर इन्कमटॅक्स व सुपरटॅक्ससंबंधी ५ वर्षांकरितां दिलेली सूट महत्त्वाची आहे. भारतांतील औद्योगिक कंपनीनें विदेशांतील प्रमुख कंपनीला पाठविलेला लाभांश ( Dividends ) करमुक्त आहे. लोहपोलादसारख्या व मूलभूत रासायनिक उद्योगांतील विदेशी भांडवलावर मिळत असलेला लाभांश जर विदेशांत ३१ मार्च १९५२ नंतर पाठविण्यांत आला तर त्यावर मिळणारी सूट विशेष आकर्षक समजली जाते. उद्योगधंदा नवीन असेल तर त्यासाठीं जी यंत्रसामग्री वापरण्यांत आली असेल त्या यंत्रसामुग्रीच्या किंमतीच्या, पहिल्या वर्षांत २५ टक्के करांत सूट देण्यांत येते व एकूण भांडवली गुंतवणुकीच्या १२५ टक्के घसारा व झीज म्हणून देण्याची सुटीची तरतूद केली आहे. जर धंदा तोट्यांत आला असेल तर अशा प्रकारची सवलत सतत ८ वर्षेपर्यंत

---

७. Economic Weekly– Bombay. 4 th Nov. 1961.

८. जी. एल्. मेहता–ह्यांनीं दिलेल्या इंटरनॅशनल इंडस्ट्रीयल कॉन्फरन्समधील संभाषणांतून.

9. Investment in India – Celia I. Herman.



अनुक्रमणिका






उपलब्ध होते. तसेंच धंद्याच्या व उद्योगाच्या वाढीसाठीं शास्त्रीय, तांत्रिक व सामाजिक संशोधन ( Social Research ) करण्यासाठीं झालेल्या खर्चावर विशेष कर-सुटीची सवलत दिली जाते. विदेशांतून येणारे तंत्रज्ञ व तज्ज्ञ ह्यांना भारतांतील त्यांच्या पहिल्या वर्षाच्या वास्तव्यांतील मिळकतीवर इनकमटॅक्स आकारला जात नाहीं. त्यांची सेवा भारत सरकारनें मान्य केलेली असेल तर नंतरच्या दोन वर्षेपर्यंत ही सवलत वाढविण्यांत येते. सारांश, विदेशी भांडवल भारतांत आकर्षित होण्यासाठीं सरकारनें अनेक प्रकारच्या सवलती दिलेल्या आहेत.

## गेल्या दहा वर्षांच्या स्थितीची दिशा

१९४८ ते १९५९ या कालखंडात खाजगी क्षेत्रांतील विदेशी भांडवलाची भारतांतील गुंतवणूक पाहूं गेल्यास ती ३३ टक्क्यांनी वाढली आहे ! सरकारी पातळीवरील विदेशी भांडवलाचा हिस्सा मात्र १६·४ टक्क्यांनी वाढला. उलटपक्षी, खाजगी क्षेत्रांतील विदेशी भांडवलाचें प्रमाण ८३·६ टक्के होतें. १९५५ मध्यें खाजगी व सरकारी क्षेत्रांत एकंदर ३९० कोटी रु. ची परकीय भांडवली गुंतवणूक झाली. अर्थात् ही उद्योग व व्यापार या दोन्ही क्षेत्रांतील होती हें स्पष्ट केलें पाहिजे. या रकमेपैकीं ३२३ कोटी रु. चें भांडवल एकट्या इंग्लंडचें होतें ! अमेरिकेची गुंतवणूक केवळ ३८ कोटी रु. ची होती. बॅंकेच्या व्यवसायांत १९५६ मध्यें ३६·४ कोटी रु. गुंतविले गेले; पण त्यावर्षी औद्योगिक व व्यापार क्षेत्रांतील गुंतवणूक ५०६ कोटी रु. पर्यंत वाढली. खालील तक्त्यावरून १९५९ पर्यंतच्या विदेशी भांडवलाची रूपरेषा समजून येईल.[10]

| वर्ष | खाजगी विदेशी भांडवल | सरकारी पातळीवर आयात केलेलें विदेशी भांडवल | एकूण भांडवल ( कोटी रु. ) |
|---|---|---|---|
| १९४८ | २५५·८ | — | २५५·८ |
| १९५३ | ३९२·० | — | ३९२·० |
| १९५५ | ४५३·४ | २·५ | ४५६·१ |
| १९५६ | ४७८·२ | १४·८ | ४९३·० |
| १९५७ | ४९६·१ | ४६·९ | ५४३·० |
| १९५९ | ५११·५ | ९९·५ | ६१०·७ |

विदेशी भांडवलाच्या गुंतवणुकीच्या पद्धतीवरून असें स्पष्ट होतें कीं हें भांडवल विशिष्ट धंद्यांतच गुंतविलें गेलें आहे. फार तर अर्थशास्त्रीय भाषेंत त्यास ‘ केन्द्रित ’ झालें आहे असें म्हटल्यास वावगें होणार नाही. पेट्रोलियमचा धंदा, मळे, खाणी काम व निर्माण कार्य ( Manufacture ) हे खाजगी विदेशी भांडवलांचे अत्यंत आवडते धंदे आहेत. त्या धंद्यांत विदेशी खाजगी भांडवल व सरकारी पातळीवर आयात केलेलें भांडवल ह्यांचा अभ्यास केला तर खाजगी भांडवल कसें अग्रेसर आहे हें

10. Reserve Bank of India Bulletin, May, 1961.



अनुक्रमणिका






स्पष्ट आढळून येईल. उदाहरणार्थ १९५९ मध्ये भांडवली गुंतवणूक खालीलप्रमाणें होती.[11]

| धंदा | खाजगी विदेशी भांडवल | सरकारी पातळीवरील विदेशी भांडवली आयात |
|---|---|---|
| पेट्रोलियम | ११९·० | १·७ |
| मळे | ८९·९ | ५·२ |
| खाणी | ११·४ | १·६ |
| कारखाने | १३१·७ | ११९·० |
| व्यापार | ८२·५ | १०·२ |
| बँकिंग | १३·४ | २५·१ |
| एकूण विदेशी भांडवल ६१०·७ कोटी रु. | ४४७·९ | १६२·८ |

वरील तक्त्यावरून हें स्पष्ट होतें कीं भारतांत १९५९–६० पर्यंत ६११ कोटी रु.ची विदेशी औद्योगिक भांडवली आयात झाली. यापैकीं ४४८ कोटी रु. च्या भांडवलावर भारतीयांचें नियंत्रण नव्हतें. कारण तें भांडवल खाजगी असल्यामुळें विदेशी कंपन्यांनी आपल्या भारतीय शाखेंत निर्यात केलें होतें. याचा अर्थ हाच कीं ६३·४ टक्के भांडवल पूर्णतः विदेशी नियंत्रणाखालीं आहे. सरकारी पातळीवरील १६३ कोटी रु. च्या भांडवलावर म्हणजे ३३·६ टक्के भांडवलावर सरकारचें नियंत्रण होतें ! वरील ६११ कोटी रु. पैकी ४०० कोटी रु. एकट्या इंग्लंडचेच आहेत. अमेरिकेचे ८२ कोटी रु., जपानचे १·४ कोटी रु., स्वित्झरलँडचे ७ कोटी रु., पश्चिम जर्मनीचे ५·४ कोटी रु. व जागतिक बँकेचे ८३ कोटी रु. वरील एकूण भांडवलांत अंतर्भूत आहेत.

### निष्कर्ष

वरील माहितीवरून महत्त्वाचे अनुमान निघतात ते येणेप्रमाणें—

( १ ) भारतांतील औद्योगिक विकासांसाठीं झालेल्या विदेशी भांडवलाच्या गुंतवणुकींत खाजगी भांडवलाचें वर्चस्व व प्राबल्य शक्तिशाली आहे. मळे, पेट्रोलियम, खाणी, बँका, भांडवली व उपभोग्य वस्तू ( Capital and Consumers industries ) त्या धंद्यांत खाजगी भांडवलाचें केंद्रीकरण प्रकर्षानें आढळतें. संपूर्ण भांडवली गुंतवणुकीच्या ७३·३% भांडवल इंग्लंडचें आहे. वसाहतवाद व अर्थप्रबंधनात्मक ( financial obigarchy ) साम्राज्यशाहीचे अजूनहि भारतांत राहिलेले हे अवशेष आहेत असेंच म्हणतां येईल.

( २ ) सद्यःपरिस्थितींत क्रमशः परिवर्तन घडून आलेलें आढळतें. इंग्लंडच्या आर्थिक पकडीची गांठ हळू हळू ढिली पडत आहे. कारण, आंतरराष्ट्रीय मुद्रा कोष व जागतिक बँक विशाल प्रमाणावर भारतास भांडवल पुरवीत आहेत. अमेरिका, जपान, रुमानिया, न्यूझिलंड, रशिया, पश्चिम जर्मनी, स्वीडन, नॉर्वे, हॉलंड इ. देश भारताच्या औद्योगीकरणासाठीं मदत देत आहेत. त्यामुळें ब्रिटिशांचा भांडवली मक्तेदारी ( Monopoly ) चा बालेकिल्ला ढांसळत आहे असें विधान केलें तर चूक होणार नाहीं.

( ३ ) दोन पंचवार्षिक योजनांच्या काळांत, विशेषतः दुसऱ्या पंचवार्षिक योजनेपासून, सरकारी गुंतवणूक मोठ्या प्रमाणावर वाढत आहे. पहिल्या योजनेंत ही गुंतवणूक केवळ ६० कोटी रु. ची होती; दुसऱ्या योजनेंत ती ७२० कोटी रु. व तिसऱ्या

11. Reserve Bank of India Bulletin May 1961.

योजनेंत १६५० कोटी रु. ची होणार आहे. उलट पक्षी खाजगी भांडवली गुंतवणूक अनुक्रमे ३३० कोटी रु., ८५० कोटी रु. व १३०० कोटी रु. ची आहे, म्हणजे तिसऱ्या योजनेंत सरकारी गुंतवणूकीचें वर्चस्व राहणार आहे. व समाजवादी ध्येयानुसार सरकारी क्षेत्र वाढणें हें उचितच होय.

( ४ ) अमेरिकी भांडवलाची सरकारी पातळीवरील आयात हें वैशिष्ट्यपूर्ण परिवर्तन सद्यःपरिस्थितींत महत्त्वाचें मानलें जातें. अमेरिकी भांडवलास भारतांत येण्यास अनुकूल परिस्थितिहि आहे. कारण अमेरिकी भांडवलास मिळणारा मोबदला सरासरीनें १२·८% पडतो; तर इंग्लंडच्या भांडवलावर हें मोबदल्याचें प्रमाण ९·५% पडतें.

( ५ ) जोंपर्यंत भारतीय उत्पन्नाच्या १५ ते २० टक्क्यांपर्यंत बचत वाढत नाहीं, तोंपर्यंत भारताच्या औद्योगीकरणासाठी विदेशी भांडवलांची मदत घ्यावी लागणार आहे. जरी आपल्या विकासाचा वेग १९५२ च्या मानानें ३·६ पासून १९५९ मध्ये ५·१ पर्यंत[१२] वाढला तरी तो समाधानकारक नाहीं. हा वेग वाढविण्यासाठी विदेशी भांडवल आयात करावें लागेल. देशांतर्गत बचत करण्यासाठी अधिक प्रयत्न करणें अत्यावश्यक आहे.

---

## लेखकांना विनंति

( १ ) ' नवभारत ' मासिकासाठीं पाठवावयाचे लेख कागदाच्या एकाच बाजूवर शाईनें सुवाच्य लिहावे.

( २ ) लेखाची पोंच ताबडतोब देण्यांत येऊन त्यासंबंधी निकाल सामान्यतः एक महिन्यांत कळविण्यांत येईल. न स्वीकारलेला लेख परत करण्यासाठीं अवश्य तो टपालखर्च पाठवावा.

( ३ ) लेखाची मर्यादा सामान्यतः ४००० शब्दांहून अधिक नसावी. अनेक अंकांतून लेखांक देण्यापेक्षां विशिष्ट मुद्यावर स्वतंत्र लेख लिहिणें बरें.

( ४ ) आशयाला बाध न आणतां लेखाची मर्यादा कमी करण्याचा अधिकार संपादकमंडळाला राहील.

( ५ ) लेखाबद्दल अल्पस्वल्प मोबदला देण्याचें संपादकमंडळानें ठरविलें आहे.

( ६ ) अभिप्रायासाठीं पाठवावयाच्या पुस्तकांच्या दोन प्रती येणें लवकर अभिप्राय देण्याचे दृष्टीनें अधिक सोईचें पडतें.

( ७ ) लेख, संपादकासाठीं इतर कांहीं मजकूर व अभिप्रायासाठीं पुस्तकें कार्यकारी संपादकांचे पत्त्यावर मुंबईस पाठविणें.

12. H. V. R. Iengar's speech at Bureau of Industrial statistics, Calcutta.












श्री. नरहर विष्णु गाडगीळ (चंदिगड)

# फाळणीनंतरचा पंजाब : आर्थिक प्रगति

भारताचा वज्र-बाहु पंजाब याचें क्षेत्रफळ ४७३३४ चौरस मैल आहे, म्हणजे भारताच्या क्षेत्रफळापैकी ४·३ टक्के आहे. भौगोलिकदृष्ट्या तीन विभागांत त्याची वाटणी आहे. एक हिमालयांतील भाग, दुसरा शिवाली डोंगराच्या वर व लागून असलेला भाग, व तिसरा म्हणजे मैदानी भाग. सिमला व कांगडा जिल्हे पहिल्या भागांत पडतात. होशियारपूर अंबाल्याचा काही भाग हे दुसऱ्या भागांत पडतात व राहिलेला प्रदेश तिसऱ्या विभागांत. पंजाब म्हणजे पांच नद्यांचा मुलुख, फाळणी नंतर रावी, ब्यास, सतलज व पूर्वेची सरहद्द म्हणजे यमुना. याशिवाय हाजारजीचें पूर्वीचें नांव सरस्वती असें मानलें जातें. ती कांहीं भागांत वाहते व राजपुतान्याजवळ येतांच गुप्त होते. मैदानी भाग अतिशय सुपीक आहे. पर्जन्य व कालवे यामुळें तो अधिक संपन्न झाला आहे.

## लोकांतील साहस आणि उपक्रमशीलता

पंजाबची लोकसंख्या १९५१ च्या जनगणने प्रमाणे १ कोटी ६० लक्ष होती. आतां ती २ कोटी ९ लक्ष झाली आहे. मैली वस्ती ३६० आहे. हिंदुस्थानच्या मानाने अधिक आहे. तथापि शहरांतून व समृद्ध भागांतून ती अधिक आहे. हिंदुस्थानच्या मानाने पंजाबी शहरी वस्ती अधिक आहे. विशेष हें की पंजाबमधील मुख्य मुख्य शहरें अमृतसर, जालंधर, अंबाला, लुधियाना, हिसार, पानपत, सोनपत, हीं सर्व औद्योगिक शहरें आहेत. चंदिगड हें अद्यापि कारकुनांचें शहर (बाबू टाऊन) आहे. पण तेंहि आतां झपाट्यानें औद्योगिक शहर बनत आहे. नोकरीच्या निमित्ताने पंजाबबाहेर व भारताबाहेर जाण्याच्या बाबतीत पंजाबी लोकांचा नंबर पहिला लागतो. काम करणाऱ्या वयाच्या माणसांपैकीं ६६ टक्के शेतकींत आहेत. ८ टक्के उद्योगधंद्यांत आहेत व सुमारे २५ टक्के अनुषंगिक क्षेत्रांत आहेत. सामान्यपणे एकंदर लोकसंख्येपैकी ४२ टक्के काम करण्याच्या वयांत आहेत. शेतीच्या क्षेत्रांत काम करणाऱ्या व्यक्तिमागें सामान्यपणे चार एकर क्षेत्र असतें. भारताच्या सरासरीनें हें २५ टक्के अधिक आहे. शहर विभागांत बेकारीचें प्रमाण भारतांतील सरासरीपेक्षां पुष्कळच कमी आहे. लोकांची प्रवृत्ति कांम करण्याकडे आहे. त्यांच्यात साहस, उपक्रमशीलता व शारीरिक श्रम करण्याची क्षमता मोठ्या प्रमाणांवर असल्याने सामान्य जीवनस्तर भारतापेक्षां थोडा अधिक चांगला आहे.

## विद्युच्छक्तीचा वाढता वापर

नैसर्गिक संपन्नतेच्या दृष्टीने खनिजसंपत्ति फारशी नाहीं. कोळसा नाहीं. धातुविषयकपण संपत्ति न.हीं. चुना व स्लेट यांचा पुरवठा मोठ्या प्रमाणांत आ . जंगलविषयक संपत्ति विशेष म्हणतां येण्यासारखी नाहीं. पण इमारतीचें लाकूड बऱ्याच प्रमाणांत आहे. हिमालयांतून येणारें अनगड लाकूड पंजाबमध्यें तासलें जातें. व येथून त्याचा पुरवठा पंजाब व पंजाबबाहेर होतो. शेतीविषयक उत्पन्न हें वाढलें आहे. धान्याचें उत्पादन अधिक आहे आणि दुसऱ्या पंचवार्षिक योजनेंत पांचव्या वर्षाचे अखेर गाठावयाचें लक्ष्य तिसऱ्याच वर्षी गांठलें आहे. १९६०–६१ सालीं १ कोटि ९ लाख एकर जमीन पाण्याखालीं भिजत होती. लागणीस योग्य असलेल्या जमिनीपैकी ५२ टक्के जमीन पाण्याखाली आहे. भारताचे सरासरीप्रमाणे १७ टक्के आहे. कालवे, ट्यूब वेल्स, तलाव, या सर्व गोष्टींमुळें शेतीच्या दृष्टीनें पंजाब आज भारतांत प्रमुख आहे. विजेच्या उत्पादनाच्या दृष्टीने हिंदुस्थानांतील जें विजेचें उत्पादन आहे त्यांत २१ टक्के पंजाबमध्ये आहे. विजेची मागणी सारखी वाढत आहे. फाळणीचे वेळीं ती १० हजार किलोवॅट होती तर १९५८ साली १ लक्ष ११ हजार किलोवॅट झाली. १९६२ साली ही मागणी ४ लक्ष ७८ हजारांपर्यंत गेली असून ती पुरी करण्याच्या दृष्टीनें पंजाब सरकारचे प्रयत्न यशस्वी होतील. भाखरा धरणाच्या दक्षिणेकडील बिजली घरांतून ४ लक्ष ५० हजार किलोवॅट टर्बैन गेल्या महिन्यापासून मिळूं लागले आहेत. पुढील ४ वर्षात भाखरा धरणाच्या उजव्या बाजूच्या बिजली घरांतून ६ लाख किलोवॅटचा पुरवठा होईल व पांग बंधाऱ्याजवळ बांधण्यांत येणाऱ्या बिजली घरापासून आणखी १ लक्ष २० हजार किलोवॅट वीज उत्पन्न होणार आहे. पंजाबमध्यें आज सर्व शहरांतून विजेचा प्रकाश दिसून येतो. २३ हजार खेड्यांपैकीं

४ हजार खेडीं आज विजेनें सुशोभित आहेत. पुढील पांच वर्षांत आणखी ६ हजार खेडीं सुशोभित करण्याचा कार्यक्रम आहे.

## छोट्या कारखानदारींत अग्रेसर

पंजाबच्या आर्थिक व्यवस्थेचें स्वरूप सामान्यपणे असें आहे की, १९५६ साली जें उत्पादन रु. ५०० कोटींचें होतें, तें आज जवळ जवळ १०० कोटींनीं वाढलें आहे. यापैकीं ४६·९ टक्के शेती, ११·३ टक्के उद्योग आणि आनुषंगिक ४१·८ टक्के असें प्रमाण ५६ सालीं होतें. आतां उद्योगधंद्यांत हें प्रमाण थोडें वाढलें आहे. उद्योगधंद्याच्या दृष्टीने जी प्रगति झाली आहे ती अगदीं गेल्या १०-१२ वर्षांतील आहे. आणि उद्योगधंद्याला लागणारा माल शेताचा असल्याने सामान्यपणें उद्योग-धंद्याचें स्वरूप मध्यम व लहान प्रमाणावरचें आहे. शेतींत ज्याप्रमाणे पंजाब हा प्रमुख आहे त्याचप्रमाणे लहान उद्योगधंद्यांत तो प्रमुख मानला जातो. शेतीमध्यें प्रगति असली तरी उद्योगधंद्यांतील प्रगतीचा वेग अधिक आहे. त्याचें मुख्य कारण म्हणजे विजेचा मोठ्या प्रमाणांत पुरवठा. फाळणीपूर्वीं परिस्थिती अशी होती कीं भारत पंजाबांत ४१५ कारखाने आणि पाक-पंजाबांत ६०२ कारखाने होते. भारत पंजाबचें क्षेत्रफळ अखंड पंजाबच्या ४८ टक्के होतें. त्यांत शेतीखालील जमीन ३९ टक्के होती आणि पाण्याखालील जमीन २८ टक्के होती. उद्योगधंदे विशेषतः फाळणीनंतर अमृतसर, जालंधर, गुरुदासपूर, फिरोजपूर, लुधियाना येथें होते ते सुरुवातीला कमी झाले. पण ११२ वर्षात पुन्हा त्यांना चालना मिळाली. आज कारखान्यांची संख्या ४००५ आहे. म्हणजे जवळ जवळ दसपट वाढ झाली, त्यांत ७ साखरेच्या गिरण्या, ४०० लोकरीचे कारखाने, ९०० यांत्रिक मागांचे गट, व २१४ कापूस पिंजण्याच्या गिरण्या आहेत. याशिवाय दोन सिमेंटचे, ३ कागदाचे, २६ सरस व टर्पेटाईनचे, ४९ सायकल व सायकलचे भाग यांचे, असे कारखाने आहेत. दरसाल ४ लाख सायकलींचें उत्पादन पंजाबमध्यें होतें. खेळण्याचें सामान तयार करणारे २२५ कारखाने आहेत. सालोसाल या कारखान्यांचें उत्पादन वाढत आहे. पाहिल्या पंजाबमध्यें जें साखरेचें वार्षिक उत्पादन होतें तें चौपट म्हणजे ९८ हजार टन झालें आहे. सिमेंटचें दुप्पट ६॥ लाख टन, कागदाचें दुप्पट म्हणजे २५ हजार टन, शिवण्याच्या यंत्रांचें चौपटीने वाढलें म्हणजे ६१ हजार उत्पादन झालें आहे. सायकलींचें उत्पादन वार्षिक ८५ हजारापासून ४ लाख ७ हजारापर्यंत गेल आहे. दुसऱ्या पंचवार्षिक योजनेच्या शेवटच्या वर्षांपासून मोठ्या उद्योगधंद्याकडे लक्ष देण्यांत आलें. त्याप्रमाणे कांहीं कारखान्यांना सुरुवात झाली आहे. तथापि पंजाबचा औद्योगिक क्षेत्रांतला पराक्रम लहान लहान धद्यांबाबत आहे. अशा धंद्यांचे सुमारे १५ हजार युनिट्स् असून त्यांत ६० हजारावर कामगार आहेत. या लहान युनिट्स्चें उत्पादन दरसाल ४० कोटीचें आहे. लहान उद्योग-धंद्यांत क्रांतिकारक बदल होत आहे. सुरुवातीचें जें स्वरूप होतें तें आतां बदलून यंत्रें, यंत्रांचे भाग, सायकली, शिलाईचीं यंत्रें, यांचें उत्पादन होऊं लागलें आहे. शेतकीचीं अवजारें यांचें उत्पन्न ४॥ कोटीपर्यंत गेलें आहे. बराळा यथ तर देशाला लागणारीं लहान लहान यंत्रें व तत्संबंधीचीं अवजारें यांचें उत्पन्न देशां-तील तत्संबंधि उत्पादनाच्या ५० टक्के आहे. या सर्वांचा परिणाम म्हणजे रोजगार वाढत आहे. १९५१ ते ५७ या सहा वर्षांत दरसाल ९ टक्यांनीं रोजगारांत वाढ होत आहे.

## शेतींतील तूट भरून निघून वर शिल्लक

शतीच्या उत्पादनाबाबत तपशीलवार सांगावयाचें झाल्यास स्वातंत्र्याच्या सुरुवातीला पंजाबांत ३१·७३ लाख टन अन्नधान्याचें उत्पादन होतें म्हणजे जरुरी पेक्षा कमी होतें. १० वर्षांत हें उत्पादन ६१·५० लाख टन झालें. म्हणजे ३५ हजार टनांची कमतरता नाहीशी करून १२ लाख टन अधिक उत्पादन होऊं लागलें. लांब धाग्याचा कापूस व अन्य कापूस ७ लक्ष ८८ हजार गाठीपर्यंत निर्माण होऊं लागला आहे. लांब धाग्याचा कापूस निर्माण करण्याच्या हिंदुस्तानां-तील प्रयत्नांत पंजाबचें प्रमाण ८० टक्के आहे. तें मुख्यत्वें फिरोजपूर जिल्ह्यांत आहे. तसेंच उसाचें उत्पादन चौपटीने वाढलें आहे. तेलबियांचें उत्पादन २ लाख टनापासून ३ लक्ष १० हजार टनापर्यंत गेलें आहे. १० वर्षांत पेरणीखाली आलेल्या जमिनीत २० लाख एकरांची वाढ झाली आहे. पाटबंधारे आणि जमिनीचें एकीकरण ( कन्सॉलिडेशन ) हें याचें मुख्य कारण होय. ३० एकरांपेक्षां अधिक असलेली जमीन मालकांना स्वतः



अनुक्रमणिका






कसतां येत नाही, ती अन्यांना द्यावी लागते. हें टाळण्यासाठी अनेक जमीनदारांनी सहकारी शेतकी स्वीकारून आपल्या नातेवाईकांना त्यामध्ये भाग दिले आहेत. शेती पूर्वीसारखीच सलग आहे, पण करण्याचें संघटन बाह्यतः तरी सहकारी तत्त्वाचें आहे. जमिनीच्या धारणेच्या क्रियेंत झपाट्यानें फरक झाला आहे. मोठ्या प्रमाणावर शेती करणारे कमी होऊं लागले आहेत. त्यामुळे थोडा चांगला परिणाम उत्पादनाच्या दृष्टीने झालेला आढळून येतो. कारण लहान शेतकरी सोसायट्यामार्फत शेतीला अवश्य लागणारीं अवजारें व त्याप्रमाणे कर्ज घेतो व आपलें उत्पादन मार्केटिंग सोसायटीमार्फत विकतो. आज पंजाबमध्यें सहकारी सासायट्यांची संख्या लोकसंख्येच्या मानाने सर्वांत जास्त आहे. सामान्यपणे ९० टक्क्यांवर गांवें व ८० टक्क्याच्या वर शेतकरी सहकारी संघटनेंत वावरत आहेत.

## प्रथम सुजलाम् मग सुफलाम्

शेती क्षेत्रांतील व औद्योगिक क्षेत्रांतील प्रगति करण्याचें श्रेय पंजाब मधून वाहाणाऱ्या रावी, ब्यास, सतलज या नद्यांना आहे. सतलजच्या पाण्याचा उपयोग भाखरा येथील गोविंदसागर धरणाने सामान्यपणे निम्यापेक्षा अधिक पंजाबांतील क्षेत्रांना होत आहे. ४० लाख एकर जमीन या धरणावर निघणाऱ्या कालव्याखालीं सुजलाम् सुफलाम् होत आहे. या गोविंद सागराच्या पाण्यावर उत्पन्न होणारी वीज आज ६ लाख किलोवॅट आहे. व तितकीच आणखी ४ वर्षांनी उजव्या बाजूनें बिजलीघर झाल्यानें होणार आहे. या बहुविध योजनेने शेतीला पाणी, कारखान्यांना वीज, व त्यामुळें होणाऱ्या समृद्धींतून बेकारांना रोजगार मिळत आहे. ही व ब्यासची योजना पुरी झाल्यानंतर तिसऱ्या पंचवार्षिक योजनेच्या शेवटीं अन्नधान्यांत ११ लाख टनांची भर पडेल. विजेच्या उत्पादनांत ८ लाख किलोवॅट भर पडेल व औद्योगिक क्षेत्राचा विस्तार होईल. ज्या भागांत कालव्याचें पाणी मिळत नसे तेथील उत्पादन अनेक पटीनीं वाढलें आहे. भाखरा व ब्यास या योजनांनी पंजाबचें स्वरूप बदललें आहे. त्याचा कायापालट झाला आहे. भाखरा योजनेने विजेचा पुरवठा काश्मीर, हिमाचल प्रदेश, दिल्ली व राजस्थानमधील जसलमीर बिकानेर पर्यंत होणार आहे. नंगल येथील खाद्याच्या कारखान्याला १ लाख २० हजार किलोवॅटचा पुरवठा भाखरा योजनेपासून होणार आहे.

## हिमालय आणि सतलज यांचें सान्निध्य

गेल्या १० वर्षांत रस्त्यांचें निर्माणकार्य तसेंच प्रगतिपर आहे. मोटार वाहतूक तीन चतुर्थांश सरकारी आहे. शिक्षणक्षेत्रांत प्राथमिक शिक्षण सक्तीचें व फुकट आहे. १२ शे रु. उत्पन्नाच्या आंत ज्यांचें उत्पन्न आहे अशांच्या मुलांना दुय्यम शिक्षण सुद्धां फुकट आहे. टेक्निकल संस्था प्रत्येक जिल्ह्यांत किमान एक आहे. तेथें शिक्षण पुष्कळ अंशाने मोफत दिलें जातें. विश्वविद्यालयें दोन असून १५० च्या वर कॉलेजेस आहेत. सर्व क्षेत्रांतून जोरानें प्रगति होत आहे. पंजाबच्या माणसाचें सरासरी उत्पन्न भारताच्या नागरिकाच्या सरासरी उत्पन्नापेक्षां २० टक्यांनीं जास्त आहे. १४ ऑगस्ट १९४७ रोजी लाहोरला सर्व शहर पेटलेलें दिसत होतें आणि गुरुद्वारांतून अग्नीचें भक्ष्य होणाऱ्या अनेक शिखांच्या 'सत् श्री अकाल' या आरोळ्या ऐकल्याचीं व पाहिल्याचीं दृश्यें अनेकजण अजूनहि आठवतात. हिंदु व शीख यांनीं मुसलमानाकडून होणाऱ्या त्या वेळच्या कत्तलींचा मुकाबला कसा केला याच्या वीर कथा पंजाबी व हिंदी वाङ्मयांत चिरस्मरणीय होऊन राहिल्या आहेत. सरहद्द ओलांडतांना पिढ्यान्‌पिढ्या कमावलेली संपत्ति चल व अचल सोडून भविष्याबद्दल अनिश्चित अशा स्थितीत लक्षावधि हिंदु व शीख भारतांत आले; सर्व त्यांचें नष्ट झालें होतें. पण त्यांची हिंमत व धर्म विषयक श्रद्धा हिमालयाप्रमाणें अढळ व सुस्थित होती. त्यांची आशा व प्रयत्न करण्याचा स्वभाव सतलजच्या प्रवाहाप्रमाणे सतत वाहाणारा होता. त्यांचें भाग्य तेथे नष्ट झालें होतें पण भारतांत येतांच त्यांनीं आपलें भाग्य स्वतः बनविलें, त्याचे ते कारागार झाले. सुदृढ शरीर, कष्ट करण्याची सवय व स्वाभिमान या गुणांनी भारतांतील पंजाबच्या लोकांनी ७ वर्षांत पंजाबचा स्वर्ग बनविण्याचें बरेचसें कार्य केलें आहे. जेथे ते जातात तेथे आपल्या मेहनतीने मोहब्बत उत्पन करतात हा अनुभव सर्वत्र आहे. आणि मेहनत हीच उत्कर्षाची एकमेव वाट आहे.

---



अनुक्रमणिका

प्राचार्य म. ना. वानखडे

# झेनचें ओझरतें दर्शन

महात्मा गौतमबुद्ध निर्वाण पदाला पोचल्यानंतर बौद्धधर्मांत पथ पडूं लागले. हीनयान व महायान हे ह्यांत प्रमुख आहेत. ह्याशिवाय ज्या ज्या देशांत बौद्धधर्माचा प्रसार झाला, त्या त्या देशांत या धर्मानें विविध देशांतील रीतिरिवाजाप्रमाणें निरनिराळीं रूपें धारण केलीं. तिबेटांत त्याला तांत्रिक स्वरूप आलें; चीनमध्ये त्याच्यावर कन्फ्युसिअस आणि लावत्से यांची छाप पडली. झेन हा बौद्धधर्माचा पंथ चीनमध्यें प्रथम निर्माण झाला व तेथून जपानमध्यें ह्याचा प्रसार झाला. कांही काळानंतर चीनमधून ह्याचें उच्चाटण झालें, पण जपानमध्ये अजून तो या ना त्या स्वरूपांत टिकून आहे. सापुराई, चित्रकला, काव्य (हैकू ही तीन ओळींची कविता लक्षणीय आहे.), चहाचा समारंभ, फुलांची मांडणी, कुस्ती, ज्युडो, धनुर्विद्या इत्यादीवर या धर्माचा प्रभाव पडलेला दिसून येतो. जपानबाहेर या पंथाला विशेष प्रसिद्धी मिळण्यास डॉ. डी. टी. सुझुकी ह्यांचें इंग्रजींतील विपुल लेखन कारणीभूत झालें आहे. अमेरिकेंत यांचे ग्रंथ फार मोठ्या प्रमाणावर प्रसिद्धी पावले आहेत व ह्यांचे अनुयायी सबंध युरोपभर आज सापडतात.

## साक्षात्कार

साक्षात्कार ( Enlightenment ) हें जें बौद्धधर्माचें तत्त्व आहे, तें ह्या झेनपंथात महत्त्वाचें आहे. अष्टांग मार्ग किंवा 'चार महत्त्वाचीं सत्यें' यांना फार महत्त्व दिलें गेलें व त्यावरच पुढें बौद्धधर्माची बांधणी होऊं लागली. परंतु झेनपंथाच्या मतें अष्टांग-मार्ग किंवा चार सत्त्यें हीं बौद्धजीवनासाठीं केवळ बौद्धिक मार्गदर्शक आहेत. झेनपंथ केवळ या दोन गोष्टी म्हणजे बौद्धधर्म ही समजूत चुकीची मानतो. नीतिधर्माला याची गरज आहे यांत वाद नाहीं, पण ह्या समजुतीमुळें साक्षात्काराकडे बौद्धजनांचें दुर्लक्ष होत आहे असें झेनचें म्हणणें आहे. हा साक्षात्कार प्रत्यक्ष अनुभवणे हा या झेनपंथाच्या तत्त्वज्ञानाचा केंद्रबिंदु आहे.

## झेनचा उगम

झेनचा उगम महात्मा गौतम बुद्धाच्या जीवनांतील एका प्रसंगातून झाला आहे अशी एक समजूत आहे. शाक्यमुनि नेहमीप्रमाणें आमच्या शिष्यासमोर आले; परंतु ते कांहीच न बोलतां थांबले. त्यांनी आपल्यासमोर ठेवलेल्या फुलांचा गुच्छ हातांत उंच धरला. महाकाश्यपावाचन या कृतीचा अर्थ दुसऱ्या कुणालाच लागला नाहीं. महाकाश्यपाने मात्र स्मित केलें. तें पाहून महात्मा बुद्ध म्हणाले, "महाकाश्यपा माझ्या जवळचा अत्यंत पवित्र व किमती असा हा अध्यात्मिक ठेवा मी आजपासून तुला देत आहे." ह्या प्रसंगात बुद्धाचें अंतरंग आणि बौद्धधर्माचें सार स्पष्ट आहे. असें झेनपंथीय मानतात. बुद्ध, महाकाश्यप ते बोधीधर्मापर्यंत २८ गुरु झेनपंथ मानतो.

या बोधीधर्माने चीनमध्ये झेन पंथ स्थापन केला असें म्हणतात. हा काशीच्या राजाचा पुत्र असून त्याने सतत ४० वर्षें बौद्धधर्माचा अभ्यास केला. इ. स. ५२० मध्ये तो चीनला आला. त्यावेळीं वु नावाचा राजा राज्य करीत होता. बोधीधर्म त्याच्या दरबारांत गेला व वू ने त्याचा सत्कार केला. मिलिंद व नागसेन ह्यांच्यात झालेल्या संवादाची आठवण करून देणारा सवाद ह्या दोघांत झाला. वूने विचारलें "पवित्र बौद्धधर्माचें पहिलें तत्त्व कोणतें? तेव्हां बोधीधर्म उत्तरला "शून्य व त्यांत पवित्र म्हणण्यासारखें कांहीच नाही." ह्यावर वू ने विचारलें, 'मग माझ्यासमोर कोण बसलें आहे!" बोधीधर्म म्हणाला 'मला माहीत नाही.' झेन पंथात जें जें उद्धट, उपहासात्मक, तुटक वा आकस्मिक वागणें वा बोलणें आहे ह्याचा पाया बोधीधर्माने घातला असें आर्थर कोस्लरचें म्हणणें आहे. राजा आपल्या परीक्षेला उतरत नाहीं असें बघून बोधीधर्म तिथून निघाला व एका विहारांत ९ वर्षें एका भिंतीकडे पहात बसून राहिला. आज ज्या प्रकारचा झेनपंथ अस्तित्वांत आहे तो ह्य-वेंग ह्या गुरूच्या काळांत आला. ह्यावेळीं टँग ( T'ang ) घराणें राज्य करीत होतें. सुंग घराण्याच्या



अनुक्रमणिका






वेळ (११२७-१२७९) झेनपंथाचे विहार हीं ज्ञानाचीं आगरें म्हणून प्रसिद्ध होतीं. ह्यानंतर झेनपंथांत पुन्हा पंथ पडले. त्यापैकीं दोन ( सोटोझेन व रिझाई झेन ) आज जपानमध्ये अस्तित्वांत आहेत.

झेन हा शब्द झेना ह्या जपानी शब्दापासून आला आहे. झेना हा संस्कृतांतील 'ध्यान' या शब्दापासून आला असावा. झेनपंथ आध्यात्मिक साक्षात्कारावर सगळा भर देतो. बौद्धधर्म ग्रंथ किंवा सूत्र यांना ह्यांत कांहींच महत्त्व नाहीं. धर्मग्रंथाच्या चाकोरी पलीकडे जाऊन आत्मतत्त्वाला महत्त्व देणारा झेनपंथ आहे. ह्या आध्यात्मिक साक्षात्काराकरितां ध्यानाची गरज व म्हणून झेन हें नांव या पंथाला दिलें गेलें. सूत्र किंवा ग्रंथ हे दुसऱ्याच्या अनुभवावर आधारलेले असतात. परंतु साक्षात्कार स्वतः अनुभवल्यावांचून होऊं शकत नाहीं. व आपण बुद्धांत मिसळून जाऊ शकत नाहीं. म्हणून आत्मतत्त्व हें सगळयांत महत्त्वाचें आहे.

## शिष्यांचें शिक्षण

नवीन शिष्यांना झेनपथाच ज्ञान कशा पद्धतीनें दिलें जातें ह्याचें वर्णन रीचर्ड रम्बोल्ट नांवाच्या लेखकानें जानेवारी १९५९ च्या 'एन्काऊंटर'च्या अंकात केलें आहे. हा लेखक कोयटोजवळ असलेल्या शोभोकुजी नांवाच्या झेन विहारांत शिष्य म्हणून गेला. विहारांत मध्यभागी मुख्य मंदीर व एका कोपऱ्यांत एका उंच भिंतीमागे झेंडो ( Meditation-Hall) आहे. झेंडोत चारी बाजूंनी आंत भिंतीच्या कडेला उंचवटा आहे, याला टॅन म्हणतात. ह्या टॅनवर भिक्कू ध्यानस्थ बसतात. प्रत्येक भिक्कूला ६'×३' जागा दिलेली असते व त्या जागेवर प्रत्येक भिक्कू हटामी ( Rice-Straw ) पसरवून ध्यानस्थ बसतो. झेंडोत मंजूश्री शिवाय दुसरी मूर्ति नाहीं. विहारावर रोशी नांवाच्या साक्षात्कारी मुख्याची सत्ता असते. व झेंडोत शिस्त ठेवण्यासाठी जीकीजीत्सु (मुख्य भिक्कू) असतो. साधारण ३ वर्षे विहारांत काढल्यावर आपण बाहेरील जगांत जाऊं शकतो; किंवा इच्छा असल्यास जन्मभर विहारांत राहूं शकतो. नव्याने येऊं इच्छिणाऱ्या लोकांना विहारांत प्रवेश घेतांना बराच त्रास होतो. पुष्कळदा त्यांना शारीरिक त्रासहि होतो. परंतु झेनपंथानुसार ह्या अशा वागणुकीमुळेंच माणसांत इच्छाशक्ति व सहनशक्ति वाढते. ह्या दोन गोष्टीशिवाय झेनपंथांतील निर्वाण म्हणजे 'साटोरी' शक्य नसते.

थेरवादांत साक्षात्कार निरनिराळ्या जन्मांत अनासक्तियोग अंगीं बाणल्यामुळें होतो असें मानलें जातें, तर झेनमध्यें साक्षात्कार हा लख्खकन् चमकणाऱ्या विजेच्या लोळाप्रमाणें आहे असें मानलें जातें. ह्या विजेप्रमाणे क्षणार्धांत चमकणाऱ्या साक्षात्काराला साटोरी म्हणतात व साटोरी प्राप्त करण्यासाठीं विहारांतील कार्यक्रम असा असतो : प्रथम ध्यान ( झा-झेन ) नंतर रोशीपुढे आत्मनिवेदन. यावेळीं शिष्याला त्याला रोजच्या ध्यानधारणेंतून येणारे अनुभव रोशीला सांगावे लागतात. ह्याला झा-झेन म्हणतात. पुष्कळदा नवीन शिष्यासाठी काठीचा उपयोगहि करतात. व ह्यासाठी जीकीजीत्सुजवळ एक शिक्षेची काठी ( केसाकू ) असते. तार्किक विचार व व्यवहारी मन ह्यांचा साक्षात्कार होण्यास अडथळा येतो. शिष्याच्या मनांतून सर्व विचार-प्रतिमा नाहींशा झाल्यावरच त्याला साटोरी प्राप्त होते. ह्याकरिता रोशी वरील तिन्ही उपायांची योजना करतो.

झेंडोमध्ये शिष्य बसल्यावर जीकीजीत्सु सर्वांवर लक्ष ठेवण्यासाठीं त्याची काठी घेऊन बसतो. जरा कुणाचें ध्यानापासून लक्ष ढळलें की त्याच्यावर केसाकूचा प्रयोग झालाच. तेशान नावाचा रोशी आपल्या शिष्याला म्हणाला : "माझ्या प्रश्नाचें उत्तर दिलेंस, तर तुला ३० छड्या मिळतील; दिलें नाहीस तरी ३० च छड्या मिळतील." अशा अडचणीत टाकल्यामुळे शिष्याला साक्षात्कार होतो. केसाकूचा उपयोग शरीराला ताडून त्याबद्दल तुच्छता दर्शविणें हा नसून, साक्षात्कारासाठीं आहे. केसाकूंचा उपयोग मर्त्य व अमर्त्य जगांत जी खोल दरी आहे, ती पार करण्यासाठीं आहे असें झेनपंथीय म्हणतात.

## ध्यानासाठीं विषय

प्रत्येक भिक्कूला ध्यानासाठीं विषय देण्यांत येतो; त्याला को-आन म्हणतात. निरनिराळ्या गुरूंच्या आयुष्यांतील या संग्रहीत केलेल्या गोष्टी आहेत व त्यांचें स्वरूप उखाण्यासारखें असतें. या को-आनची संख्या अजमासे एक हजार सातशे सातशे आहे. शिष्याच्या प्रगतीच्या दृष्टीने त्याचे सोपे, थोडे कठीण,










अधिक कठीण असे प्रकार केलेले असतात. ह्या को-आनचें उत्तर तार्किक नसतेंच. शिष्याचा तार्किक विचारसरणीवरील विश्वास उडवून लावणें व साटोरीचा मार्ग मोकळा करणें हा यांचा हेतु असतो. कांहीं को-आन असे आहेत : (१) दोन हाताच्या टाळीचा आवाज होतो, एका हाताच्या टाळीचा आवाज कसा असतो ? (२) जन्म घेण्यापूर्वी तुमचा चेहरा कसा होता ? (३) सर्व गोष्टी 'एकापासूनच' आल्या आहेत व ह्या 'एकातच' मिसळतात; पण तो एक कोठून आला ? (४) एका बंद शिशीत एक जिवंत बदक आहे, शिशीला न फोडतां बदक जिवंत कसें काढता येईल ? (५) "बौद्ध धर्माचा गाभा काय ?" विचारलें असतां एका झेन गुरूने उत्तर दिलें "बागेतील सुरूचें झाड" याचा अर्थ काय ? (६) "बुद्ध म्हणजे काय" असें एका झेन गुरूला विचारलें असतां तो म्हणाला, तीन पौंड आंबाडी (Flax) याचा अर्थ काय ? (७) डॉ. सुझुकीने आपल्या एका पुस्तकांत खालील को-आन दिला आहे; ओबाकु नावाच्या झेनगुरुजवळ रिंझाई नांवाचा दुसरा तरुण झेनगुरु अभ्यास करीत होता. एके दिवशी ह्या विहारांतील मुख्य भिक्कू त्याला म्हणाला, "तू अिथे किती दिवसापासून आहेस ?" "तीन वर्षापासून" रिंझाई उत्तरला. "मग तू कधी तरी आपल्या गुरुला बौद्धधर्म म्हणजे काय विचारलेंस काय ?" "नाहीं." "मग तू त्याना विचार" रिंझाई ओबाकुजवळ गेला व त्याने तो प्रश्न आपल्या गुरूला विचारला. ओबाकनें उत्तरादाखल त्याला केसाकूनें मारलें. रिंझाई मुख्य भिक्कूकडे परत आला व झालेला प्रकार सांगितला व म्हणाला "माझ्या मूर्खपणामुळें ह्याचा अर्थ मला लागत नाही. मी इथून दुसरीकडे जातो." ह्यावर तो मुख्य भिक्कू म्हणाला "पण जाण्यापूर्वी तुझ्या गुरूला भेट." ह्याप्रमाणें रिंझाअीनें ओबाकूजवळ आपला जाण्याचा निश्चय सांगितला. ओबाकूने त्याला दुसऱ्या डईगु नांवाच्या गुरूकडे जाण्यास सांगितलें. रिंझाई डईगूकडे गेल्यावर डईगु त्याला म्हणाला "ओबाकच्या अंतःकरणांत करुणा भरलेली आहे. माझ्याकडे तुला येण्याची गरज नाही." हें ऐकल्या बरोबर रिंझाईला सगळा अर्थ समजला. त्याला साक्षात्कार झाला, व त्याने डईगूच्या कमरेंत तीन वेळा बुक्क्या मारल्या. रिंझाई ओबाकूकडे परत गेला, तेव्हा [illegible] त्याला म्हणाला "तो डईगु जर इकडे आला तर मी चांगला चोप देईन." तेव्हा, "त्याच[illegible] थांबण्याची गरज नाही. हे घे !" म्हणून [illegible] ओबाकूच्या खांद्यावर बुक्की मारली.

ह्या बुक्क्या किंवा केसाक मारण्याचे को[illegible] बरेच आहेत व असल्या या गुरूंच्या वाग[illegible] आपल्याकडील अवलिया किंवा साक्षात्कारी [illegible] आठवण होते. आपल्याकडे थापडांचा व बुक्[illegible] 'प्रसाद' देणारे किती तरी 'महाराज' होते व [illegible] व असला कृपाप्रसाद मिळायला भाग्य लागतें मानणारे किती तरी भाविक आपल्याला [illegible] सापडतील. मी असे एक बुवा पाहिले कीं, ते प्रश्न विचारणाऱ्याला शेण फेकून मारीत त्यांचे भक्त तो प्रसाद म्हणून समजत असत.

## गुरुशिष्यसंवाद

काही को-आन असेहि आढळतात : एक गुरु प्रवचन देण्याकरितां उभे राहिले आणि "[illegible] प्रवचन संपलें" असें म्हणून खाली बसले. [illegible] वेळाने त्यांनी विचारलें "हें माझें प्रवचन जर [illegible] समजलें नसेल, तर त्याने पुढे यावें." एक भिक्[illegible] आला व प्रणाम करून उभा राहिला. गुरूने 'होऽऽ' असा मोठ्याने आवाज काढला [illegible] भिक्कूला केसाकूने पिटाळून लावलें. तोसू नां[illegible] गुरूला विचारण्यांत आलें असतां "सगळें बोलणें, वा कस्पटासमान लेखून बोलण्यासकट, शेवटीं चाच भाग आहे" असें बुद्धानें सांगितलें [illegible] काय ?" तोसु म्हणाला "हो, खरें आहे" "[illegible] तुला गाढव म्हणू काय ?" यावर तोसूने त्या भि[illegible] काठीने मारलें.

मोंडो (गुरु-शिष्यांचा संवाद) या प्रकाराचा शिष्याला साटोरीच्या मार्गावर नेणे हाच आहे; झेनपंथीय म्हणतात. उदाहरणार्थ, (१) प्रश्न : [illegible] म्हणजे काय ? उत्तर : सला डफ वाजविता (२) प्रश्न : माझें आत्मतत्त्व म्हणजे [illegible] उत्तर : तें माझ्यासारखें अगर तुझ्यासारखें अ[illegible] "म्हणजे ह्यांत द्वैत नाही ?" उत्तर : अठरा हजा[illegible] दूर ! (३) जेव्हा जुन्या आरशाला [illegible]



अनुक्रमणिका






नसेल, तेव्हा त्याला काय म्हणाल ? उत्तर : जुना आरसा. आणि पॉलिश असेल तेव्हां ? उत्तर : जुना आरसा (४) प्रश्न : टाऊ (मार्ग) म्हणजे काय ? उत्तर : गाढवावरील स्वार गाढव पाहतो. (५) जोशूच्या विहारांत एक नवीन भिक्कू आला; त्याला जोशूने विचारलें, "तू इथे कधी आला होतास काय ?"

"नाही."

"मग एक कप चहा पी." जोशू म्हणाला.

दुसऱ्या एका भिक्कूला त्याने थोड्या वेळाने तोच प्रश्न विचारला. "तू इथे कधी आला होतास काय ?" त्याने उत्तर दिलें, "होय."

"मग एक कप चहा पी."

विहाराचा व्यवस्थापक इंजू ह्याला हें जरा विचित्र वाटलें. त्याने जोशूला विचारल, "तुम्ही जो इथे आला नव्हता आणि जो इथे आला होता त्या दोघांनाहि 'एक कप चहा पी.' असें सारखेंच उत्तर दिलें, हें मला समजलें नाहीं. त्यावर जोशूनें उत्तर दिलें "इंजू, एक कप चहा पी." (६) रिंझाई व फ्यूक एकदा कुणाच्या तरी घरीं जेवावयास गेले. रिंझाई म्हणाला, "एक केस समुद्र पिऊन टाकतो व फुलाच्या एका पाकळीत सुमेऊ पर्वत आहे – याचा अर्थ काय ?" फ्यूकने काही न बोलता जेवणाचा टेबल उलटासुलटा केला. दुसऱ्या दिवशी दुसऱ्या ठिकाणी देखील असेंच घडलें; तेव्हां रिंझाई म्हणाला, "ह्या तुझ्या गावंढळ रीतिभाती आहेत." फ्यूक उत्तरला "बौद्धधर्मात उद्धटपणा किंवा सभ्यपणा असें काहीच नाहीं. तू अंधळा आहेस." (७) प्रश्न : बौद्धधर्माचें तत्त्व कोणतें ? उत्तर : 'त्या तिथे गाडलेल्या बांबूला विचार.' "मला समजलें नाही." उत्तर : 'माझें अज्ञान तुझ्यापेक्षा अधिक आहे.' (८) सेकीटोने ध्यानस्थ याकुसानला विचारलें "तू काय करतोस ?"

"काहीच नाही." उत्तर.

"मग तू आळशीपणाने बसला आहेस."

"आळशीपणाने बसणें म्हणजे काही तरी करणेंच आहे."

"तू तर म्हणालास कीं, कांहीच करीत नाही. हें कांहीच म्हणजे काय ?"

"हें 'कांहींच' पूर्वीच्या गुरूंना देखील माहीत नाहीं."

## पंथाचीं मूलभूत तत्त्वें

वरील प्रकारचे को–आन व मोंडो आपल्याला विचित्र व वेडगळ वाटतात, पण झेनपंथीयांनी त्याला तत्त्वज्ञानाची जोड देऊन साधारण माणसाच्या गळी उतरविण्याचा प्रयत्न केला आहे. ह्या विचित्र वाटणाऱ्या पंथाचीं मूलभूत अशीं चार तत्त्वें सांगितलीं जातात :

(१) झेन न शिकवता येणारा व जुन्या रूढीच्या, भाविकतेच्या मताच्या विरुद्ध आहे.

(२) शब्द व भाषा यावर तो आधारलेला नाहीं.

(३) मानवी मनांत आकस्मिक प्रकाश पाडणारा आहे.

(४) आत्मतत्त्व ओळखणें व बुद्ध होणें यासाठी हा आहे.

आज ज्या प्रकारचा झेनपंथ अस्तित्वांत आहे, तो शेवटच्या तत्त्वावर भर देत नाहीं. कारण प्रत्येक जण जन्मतांनाच बुद्ध असतो असा त्याचा विश्वास आहे. यांत फरक एवढाच की, कांहीं छोटे बुद्ध असतात आणि कांहीं मोठे बुद्ध असतात. क्रमांक दोन आणि तीन हीं तत्त्वें मात्र महत्त्वाचीं आहेत. आपल्याला विचित्र वाटणारे को–आन व मोंडो यांच्याद्वारें समजूं शकतात. भाषा, शब्द, तार्किक विचारसरणी यावर झेनचा विश्वास नाहीं. वर सांगितलेल्या को–आनमध्यें तोसूनें भिक्कूला मारलें, तें त्याने तोसूला गाढव म्हटलें म्हणून नव्हे. कारण उद्धटपणा हा झेनचा महत्वाचा भाग आहे. त्याने भिक्कूला मारलें कारण भिक्कूनें तार्किक दृष्टया बरोबर उत्तर देऊन जो मोठा गुन्हा केला त्यामुळें ! माणसानें तर्कदृष्टया विचार न करितां स्वाभाविक रीतीने वागलें पाहिजे. आणि असें स्वाभाविक रीतीनें वागणें–म्हणजे उद्धटपणाने वागणें हा मोंडोचा व को-आनचा उद्देश आहे. जेव्हां गुरु विचारतो "रस्त्यानें चाललेली मुलगी तुझी लहान की मोठी बहीण ?" तेव्हां कोणता रस्ता, कोणती मुलगी असले तार्किक प्रश्न विचारणें व्यर्थ आहे. खरें उत्तर म्हणजे शिष्याने मुली सारखें चालून पहाणें व त्याद्वारें क्षणभर मुलगी होण्याचा अनुभव घेणें. कारण शब्द, भाषा हें महत्वाचें नसून अनुभव, साक्षात्कार महत्वाचा आहे.

तोसूला विचारलें " बुद्ध कोण ? "
त्यानें उत्तर दिलें " बुद्ध ."
भिक्कूनें पुन्हा विचारलें " मार्ग म्हणजे काय ? "
तोसू उत्तरला " मार्ग. "

याचा अर्थ असा की जी वस्तु आहे ती तीच आहे. ती शब्दांत कशी सांगूं शकणार! तुम्ही जितके शब्दांच्या जाळ्यांत सांपडाल, तितके त्यांत गुरफटाल व अनुभवाला साक्षात्काराला मुकाल असें झेनचें म्हणणें आहे. अंतिम सत्याचा शोध घेण्यासाठीं भाषा निर्माण झाली; परंतु अंतिम सत्य व त्याचा अनुभव हे बाजूला पडून नुसत्या शब्दांनाच महत्व प्राप्त झालें. शब्द हे अंतिम सत्याचा अनुभव घेण्याच्या उपयोगी पडत नसून उलट सत्याला दडवून ठेवण्याचें कार्य त्यांच्याकडून होत असतें. तोकुसान नांवाचा झेन गुरूकडे एक शिष्य आला व त्यानें लवून नमस्कार केला. त्याने लवण्या पूर्वीच तोकुसानें त्याला छडीनें मारलें. शिष्यानें विचारलें 'गुरु, मी बोलण्यापूर्वीच आपण मला मारलें." तोकुसान म्हणाला, "तुझ्या बोलण्याची वाट पाहण्यांत कोणाचाच फायदा नाहीं." डॉ. सुझुकी यांनी याचें समर्थन असें केलें आहे : ऐहिक जगांत जो द्वैतवाद आहे ( Dualism ) व जी व्यवहारांतील भाषा ती द्वंद्वावर आधारलेली आहे. ( उदाहरणार्थ, बुद्ध–अबुद्ध, सत्य–असत्य, गरम–थंड, प्रकाश–काळोख इत्यादि ) अशा द्वंद्वाचा अंतिम सत्याकडे जाण्यास अडथळा होतो. अंतिम सत्य ही द्वंद्वातीत अवस्था असते. तिथें प्रकाश, अंधकार असा फरक नाहीं. शिवाय भाषेमुळें अर्थापेक्षां अनर्थच अधिक होतो. म्हणून आयुष्याचा खरा अर्थ जर लावायचा असेल, अंतिम सत्य गवसायचें असेल तर शब्द, तार्किक विचारसरणी ही सर्व बाजूला सारावी लागेल.

## प्रज्ञेवर भर

हें सर्व प्रज्ञेच्या प्रभावाने होऊं शकेल. झेनपंथाच्या वर सांगितलेल्या तिसऱ्या तत्त्वांत प्रज्ञेवरच भर दिला आहे. मानवी मनांत प्रकाश निर्मिणारी प्रज्ञाच असूं शकते. झेनमध्यें ज्या मनाचा उल्लेख केलेला आहे, तें मन म्हणजे प्रकट मन नव्हे (Conscious mind). यावर भाषेचा व तार्किक विचारसरणीचा पगडा असतो. झेनचें मन म्हणजे अप्रगट मन ( unconscious mind ) होय. हें मन शब्द, भाषा आणि तार्किक विचार यांच्या पलीकडे असतें. ह्या मनाचें वर्णन " लंकावतार सूत्रा " मध्यें केलेलें आहे. बुद्ध म्हणजे तरी काय ? जो स्वतःच्या आत्म्याला पूर्णांशानें समजला आहे. ज्याची प्रत्येक हालचाल स्वाभाविक होते, तो बुद्ध होय ! असें होण्याकरितां प्रज्ञा जागृत होणें आवश्यक आहे. त्यासाठीं इच्छाशक्तीची गरज आहे. (झेनमध्यें या इच्छाशक्तीला विलक्षण महत्त्व आहे.) प्रज्ञापरिमीतासंबंधीच्या सूत्रांत, दान, शील, शांति, वीर्य, ध्यान व प्रज्ञा ह्या सहा परिमीतापैकीं प्रज्ञा ही शेवटची व अत्यंत महत्त्वाची अशी आहे. ही प्रज्ञा अचिंत्य ( beyond human under standing ) अशी आहे. ती 'मी' आणि 'तूं' यांतील फरक जाणत नाहीं. ह्या प्रज्ञेचें कार्य म्हणजे शब्दामुळें जें आपल्या विचारांतहि द्वंद्व उभें राहिलेलें असतें, त्याचा नाश करणें ! प्रज्ञेनें काळ व अंतर ( space ) पुसलीं जातात सबंध आयुष्य एका क्षणांत उजळून निघतें. प्रज्ञा (wisdom) व वि–ज्ञान ( Intellect ) यामध्यें फार अंतर आहे. वि–ज्ञानाचे मार्ग हे प्रज्ञेचे मार्ग नव्हेत. प्रज्ञेंत वि–ज्ञानाचा समावेश होतो, पण पुष्कळदां विज्ञानाच्या घमेंडींत, अंधकारांत आपण प्रज्ञेला आत्मसात करावयास विसरतो.

प्रज्ञेच्या क्षणार्धांत लखलकन् चमकणाऱ्या प्रकाशाच्या लोळाला 'साटोरी' म्हणतात. साटोरी म्हणजे साक्षात्कार; समाधि नव्हे. समाधि म्हणजे निर्वाण किंवा मोक्ष. यांच्यांत एकरूप होण्यासाठीं आत्मतत्त्वाचा नाश ! साटोरी म्हणजे स्वाभाविक जीवन जगण्यासाठीं प्रगट आत्मतत्त्वाचा नाश. समाधि म्हणजे गाढ झोप; साटोरी म्हणजे जाग. साटोरी प्रथम चित्ताची 'मुग्ध' किंवा विचारशून्य अशी अवस्था असावी लागते. त्यावेळींच आपल्या आत्मतत्त्वामधील कार्यप्रवण भाग ( acting self ) व निरीक्षक भाग ( self-observing self ) ह्यांमधील अंतर मिटते. या पुढची पायरी म्हणजे साटोरी होय.

एरीक फ्रॉम याने 'Psycho analysis and Sen Bnddism' या नांवाच्या लेखांत झेन व साटोरीला अद्यावत् स्वरूप देण्याचा प्रयत्न केला आहे. तो म्हणतो. " फ्राइड व युंग ह्या दोघांच्याहि मतें जें








अप्रगट मन आपल्याला साऱ्या वेडगळ व तर्कदुष्ट विचारांचें आगर वाटतें, तेंच अंतिम सत्याचें स्थान आहे. झेनपंथ ज्या चित्ताचें निरूपण करतो तें हेंच होय. इतर प्राण्यांस कुठल्याहि परिस्थितीशीं तादात्म्य पावण्याची नैसर्गिक देणगी असते; ती माणसांत नसते. जन्मल्यापासून त्याची सारी धडपड नवीन परिस्थितीशीं तादात्म्य पावण्यासाठीं नसून जन्मण्यापूर्वी जी 'स्व-भावाशीं' (Nature) एकमय झालेली स्थिति असते. त्यांत परत जाण्यासाठीं असते. मृत्यूंत किंवा 'वेडांतच' तो त्या स्थितीस जाऊं शकतो. बहुतेक माणसें मात्र या बाबतींत अपयशी ठरतात. त्यांना स्वरूप–प्रेमावर (Narcissism) विजय मिळवून भोवतालच्या जगाशीं एकरूप होणें हाच मार्ग मोकळा असतो. हें कार्य तो अप्रगट मनाच्या पातळीवरच करूं शकतो. शब्द व तार्किक विचारसरणी याद्वारें सामाजिक नीतिमत्तेला मान्य असलेला तेवढाच अनुभव प्रगट मनाच्या पातळीवर उतरत असतो. 'देव' शब्द म्हटला म्हणजे आपण देवाचा विचार करतो; पर्यायानें तो कसा असतो, त्याचे गुण कोणते इत्यादींचा आपण विचार करतो. परंतु आपणच देव हा अनुभव त्या शब्दांच्या द्वारें आपणांस मिळत नाहीं. म्हणजे प्रगट पातळीवरचा 'मी' हा सामाजिक (समाजानें घडवलेला व बांधलेला) 'मी' आहे. हा सामाजिक 'मी' आणि अप्रगट पातळीवरचा 'मी' यांत किती तरी अंतर आहे. ह्या दोघांतील अंतर नाहीसें करून ह्या खऱ्या, अप्रगट पातळीवरच्या 'मी' ला ओळखणें, म्हणजेच झेनमधील 'साटोरी'ला पोंचणें, त्याचा अनुभव घेणें असें एरीक फ्रॉम म्हणतो.

## पंथावरील आक्षेप

ऑर्थर कोस्लरनें आपल्या The Lotos and the Robot' ह्या पुस्तकांत झेन व डॉ. सुझुकी ह्या दोघांवरहि कोरडे ओढले आहेत. झेनपंथ हें थोतांड आहे असा कोस्लरचा दावा आहे. जपानी समाज रूढींनी जखडलेला आहे. यश देण्यापासून तो आत्महत्या करण्यापर्यंतच्या साऱ्या समारंभाच्या रीतिरिवाज रूढींनें ठरविलेल्या आहेत. आत्मवधान व सामाजिक बूज राखण्याच्या वेडानें भारावलेला हा जपानी समाज नैसर्गिक प्रवृत्तींना दडपणाखालीं ठेवतो व या नैसर्गिक प्रवृत्तींना झेनपंथ मोकळिक करून देतो. या दोन सहदर्शनीं विरुद्ध गोष्टींना सामावून घेणें हें जपानी समाजालाच जमलें. आपण ज्याप्रमाणें वर्षभर मनांत साचलेली घाण होळीच्या दिवशीं काढून टाकतो, कांही प्रमाणांत त्याच रीतीनें स्वाभाविक व नैसर्गिक भावनांना कसलीहि मुरड न घालतां वागता येण्याचा मार्ग म्हणजे झेनपंथ! (इति कोस्लर) पोचांगची झेनची व्याख्या "भूक लागली खा; दमलात तर झोपा" अशी आहे. झेनचें ज्ञान हें बौद्धिक (को–आन द्वारें) व भावनात्मक (ध्यानाद्वारें) या दोन मार्गांनीं दिलें जातें. ध्यानाचा उपयोग वाटेल त्या गोष्टीवर ताबडतोब लक्ष केंद्रित करावयास शिकविणें हा आहे असें डॉ. सुझुकी सांगतात. यावर कोस्लर म्हणतो. "या पंथांत जर देव, नीति, सामाजिक किंवा कायद्याचें बंधन, तार्किकविचार, तत्त्व हें कांहीच नाहीं, तर मग हें ध्यान लावतात तरी कशावर?" आपल्या पुस्तकावरील ख्रिस्मस इम्प्रेस ह्यांच्या एन्काऊंटर' (डिसें. १९६०) या मासिकांत आलेल्या टीकेला उत्तर देतांना कोस्लर म्हणतो कीं, आमच्या झेनपंथावर माझे दोन आक्षेप आहेत. एक बुद्धि व नैसर्गिक प्रवृत्ति यांची सांगड न घालतां बुद्धीलाच नाहीसें करण्याचा झेनचा प्रयत्न आहे. आणि दुसरा आक्षेप नीतिमत्तेचें बंधन झुगारून दिल्यामुळें दुष्ट प्रवृत्तींना वाव मिळाला. सामुराई, बुशीडो, कार्माकाझे इ० वाईट गोष्टी झेनमुळेंच जन्माला आल्या. शेवटीं तो म्हणतो "या प्राध्यापक महाशयांनीं (डॉ. सुझुकी) आतां मौन धारण करावें. पाश्चिमात्य विद्वानांना झेन हा एक दूषित, हीन दर्जाच्या विनोदाचा विषय आहे अशी सांगण्याची वेळ आतां आली आहे."

युंग या प्रसिद्ध मानसशास्त्रज्ञानें मात्र थोड्या फार प्रमाणांत झेनवरील कोस्लरचा हल्ला बोथट करण्याचा प्रयत्न केला आहे. एन्काऊंटर (फेब्रु. ६१) च्या संपादकाला त्यांनी एक पत्र लिहून त्यांत लिहिलें की, "कोस्लरचें पुस्तक वाचलें; परंतु तार्किक विचारसरणी ही मानवी जीवनाच्या अनुभवाचा फक्त एक भाग आहे. आपल्या मनांत तर्कदुष्ट प्रवृत्तींचा एक मोठा कप्पा आहे व तोच यांग, झेन इ. पंथाचा उगम आहे. पाश्चिमात्य मन हें सत्य अजून आकलन करूं शकत नाहीं. ब्रह्मांडाशीं ऐक्य,



अनुक्रमणिका






तादात्म्य पावण्याची इच्छा स्वाभाविक आहे व ह्या तर्कदुष्ट प्रवृत्तीच्या मताला आपण जितके भिऊं, तितकी ब्रह्मांडाशीं एकरूप होण्याची इच्छा बळावेल. झेन-मध्यें थोतांडाचा भाग बराच असूं शकेल, पण त्यामागें ही जी आध्यात्मिक जबर आकांक्षा आहे ती लक्षांत ठेवणें जरूर आहे."

आजच्या ॲटम बॉम्बच्या भीतीनें छाती दडपलेल्या जगाला झेनसारख्या पंथाचें आकर्षण वाटावें यांत नवल नाही. त्याला धार्मिक पुस्तकाची, सूत्राची वा मंत्राची गरज नाही. तार्किक विचारांशीं त्याचें वैर आहे. त्याचा सगळा डोलारा ज्या साटोरीवर आधारलेला आहे, ती प्रत्यक्ष अनुभवली पाहिजे. अत्यंत खाजगी स्वरूपाच्या अशा साक्षात्काराच्या अनुभवांवर (ज्याचें प्रमाण द्यावें लागत नाहीं.) आधारलेल्या झेनपंथाचा पगडा पाश्चिमात्य विचारवंतावर बसत चाललेला दिसतो. तार्किक विचारसरणीनें पाश्चिमात्य जगाला अणुयुगांत आणलें. यापुढील पायरी म्हणजे सर्वनाश ! तार्किक विचारसरणीनें जर मानवाला या स्थितीला आणून सोडलें आहे, तर तार्किक विचारसरणी ही विनाशकारक आहे हें पटवून देण्याची फारशी आवश्यकता नाही. झेन थोतांड असो वा नसो, आज पाश्चिमात्य जगाला त्याचें आकर्षण वाटत आहे, ही गोष्ट आपल्या विज्ञानावर आधारलेल्या प्रगतींत कुठे तरी चुकलें आहे ह्या जाणीवेची निदर्शक आहे हें काय कमी आहे !

---





अनुक्रमणिका







प्रा. अल्कमार व्हॉन क्युगेल्जेन् . अनुवाद. इंदुमती पारीख

# मानवी हात

सजीव प्राण्यांची शरीररचना समजावून घेणें हें शरीररचनाशास्त्राचें ध्येय होय. एखादी गोष्ट समजावून घेणें म्हणजे तर्कशास्त्राच्या नियमांप्रमाणें तिची मांडणी करणें; व अशी मांडणी निरनिराळ्या गोष्टींचा तौलनिक अभ्यास केल्यानेंच शक्य होईल.

शरीररचनाशास्त्राचा व्यवस्थित अभ्यास करण्याची पद्धति म्हणजे शवविच्छेदन करून व शरीराच्या सर्व भागांचा परस्परसंबंध लक्षांत घेऊन ते सर्व भाग जिवंत प्राण्यांत एकत्र कामें कशीं करतात हें पहाणें होय.

निसर्गाच्या व संस्कृतीच्या इतिहासांत गुरफटलेली सर्वच्या सर्व मानवजात ही कांहीं शरीरशास्त्राचा विषय होऊं शकत नाहीं. परंतु माणूस म्हणून जो सृष्टींतील चमत्कार आहे त्याबद्दलचें ज्ञान होण्यास शरीररचनाशास्त्रज्ञास आपली दृष्टि खोल व विशाल केली पाहिजे.

माणसाला आपल्या हातासंबंधीं काय वाटतें ? भाषा ही माणसाच्या विचारांचा व भावनांचा आरसा आहे. या बाबतींत त्याच्या हाताची भूमिका फारच विशिष्ट आहे. आपलें जीवन देवाच्या हातांत आहे. आपल्या मस्तकावर हात ठेवून तो आपलें संरक्षण करतो किंवा तो हात फिरून काढूनहि घेतो. माणूस यशस्वी किंवा भाग्यवान् असणें देवाच्या हातांत आहे. आपल्या भाषेंत माणूस व त्याची शक्ति यांचें त्याचा हात हेंच प्रतीक मानतात.

## हाताची भाषा

पण दुसऱ्या बाजूनें विचार करतां हाताला स्वतःची अशी कांहीं वेगळीच भाषा असते. आईचा हात सान्त्वन करतो, दिलासा देतो, तर प्रियकराचा हात प्रेमानें आलिंगितो. हात आखडलेला, विसावलेला, कणखर, अस्वस्थ किंवा खुनशी असू शकतो. हात विश्वास उत्पन्न करूं शकतात किंवा भेडसावतात, ते कापतात, भीति दाखवितात किंवा शांतहि करूं शकतात. ते शिव्या देतात किंवा प्रार्थना करतात. हातांची ही भाषा सर्वांच्या परिचयाची आहे. माणसाचें व्यक्तिमत्व दर्शविण्यास ही भाषा समर्थ मानली जाते.

माणसाच्या हाताचा व त्याच्या अहंतेचा अविभाज्य संबंध आहे. अहंता म्हणजे चेहऱ्याचें आरशांतील प्रतिबिंब नव्हे, नुसतें शरीर नव्हे, तर इथें आतां, या मितीला असलेलें माझें सर्वस्व, मी काय विचार करतों, काय बघतों, काय ऐकतों, काय आठवतों, काय काम करतों, हें सर्व होय. अहंतेची आठवण किंवा कार्यें नुसत्या डोळ्यांनीं, कानांनीं, किंवा भाषेनें होत नसून पकड घेणाऱ्या, खेळणाऱ्या व संवेदनाशील अशा हातांनींहि तितक्याच प्रमाणांत होतात.

## पावलाची भूमिका

भाषेच्या क्षेत्रांत पाऊलाची भूमिका काय आहे याचा आपण शोध घेऊं लागल्यास हाताच्या मानानें पाऊल माणसाच्या मध्यांपासून बरेंच दूर नेलेलें असल्यामुळें त्याला फारसा लाक्षणिक अर्थ नाहीं असें दिसून येतें. पावलानें हावभाव कुणी विशेष करीतहि नाहीं व हाताच्या हावभावांप्रमाणें ते पटकन् कळतहि नाहींत. पाऊल म्हणजे शरीराचा भार वहाणारा पायाचा एक भाग एवढेंच आपण समजतों. त्याची पूर्ण उपेक्षा आपण करीत नाहीं एवढेंच. फ्रॉइडनंतर मात्र कळत न कळत त्याला

लैंगिक अथ दिला जातो. पावलाशीं तुलना करतां हाताची भूमिका फार स्वतंत्र आहे. कांहीं तरी कारणानें हाताचा शरीरापासून संबंध तुटून त्याचा माणसाच्या मनाशीं रहस्यपूर्ण संबंध जोडण्यांत आलेला आहे. स्वताच्या स्वत्वाची जाणीव करून देण्यांत हाताच्या व पायाच्या भूमिका भिन्न आहेत. आपल्या पायांचा उपयोग स्वत:चें व्यक्तिमत्व दर्शविण्यासाठीं होतो याची जाणीव फक्त नर्तक लोकांनांच असते. दंवानें डंवरलेल्या फुलांना हळुवार हातानें स्पर्श करणें व उघड्या पायांनीं त्यांचेवरून चालणें यांत किती तरी फरक आहे ! हस्ताक्षर हें माणसाच्या व्यक्तित्वाचें सर्वांत जवळचें दर्शन आहे. पावलांनीं लिहिलेलें फारसें आढळत नाहीं. परंतु पावलांचें लेखन जरी ओबडधोबड असलें तरी त्यास त्या व्यक्तीच्या हस्ताक्षराचेंच वळण असतें. यावरून असें दिसतें कीं, माणसाचें हस्ताक्षर त्याच्या मनाच्या विशिष्ट ठेवणीवरच अवलंबून असतें. १९ व्या शतकांतील हस्ताक्षर–तज्ञांनीं लावलेला हा महत्त्वाचा शोध आहे.

माणसाच्या अहंतेपासून व मध्यापासून बाजूस नेलेला पाय आकारशास्त्रदृष्टया जास्त प्रगल्भ व उत्क्रान्त आहे. म्हणून शरीराचा हातापेक्षां पाय हा जास्त मानवी भाग आहे. हाताची भाषा, तोंडवळा किंवा अहंता प्रतिध्वनित करण्याची जी शक्ति आहे त्यावरून माणसाचें स्वत्व दर्शविण्याची शक्ति त्याचे हाताशीं निगडित झालेली आहे हें निर्विवाद आहे.

## हाताचें सामर्थ्य

पण माणसाच्या हातांत एवढें मानवी किंवा व्यक्तिगत आहे तरी काय ? त्याचा आकार, त्याची यंत्रणा, त्याच्या मज्जातंतूच्या क्रिया कीं त्याची मुख्य मज्जातंतूसंघांतील ( Central nervous system ) व्याप्ती ? या हाताच्या विशिष्ट गुणांची वाढ मनुष्यप्राण्याच्या उत्क्रांति बरोबरच किंवा त्याच्या मेंदूच्या वाढीबरोबर किंवा दोन पायावर चालण्याच्या शक्तिबरोबरच झाली काय ?

या सर्व प्रश्नांचीं उत्तरें देण्याचा प्रयत्न अनेक तौलनात्मक शरीररचनाशास्त्र, मानवी शरीररचनाशास्त्र, आकारशास्त्र, प्रायोगिकमज्जातंतूशास्त्र, प्राचीन प्राणिशास्त्र व प्राचीन शरीरशास्त्र या सर्व नैसर्गिकशास्त्रांच्या तज्ञांनीं केला, पण हीं सर्व शास्त्रें अपुरीं आहेत हें सर्वमान्य आहे. ज्ञानाच्या अभावाची जागा प्रमेयास घ्यावी लागली. हें विधान तौलनिक मज्जातंतूशास्त्र व प्राचीन प्राणिशास्त्र यांस विशेष लागू आहे. ही सर्व अनिश्चितता असूनसुद्धां आज मितीला या प्रश्नांचीं उत्तरें कशीं देतां येतील याचा आढावा खालीं घेतला आहे.

## चतुष्पाद प्राण्यांशीं संबंध

माणसाचा हात तौलनात्मक शरीरशास्त्रदृष्टया अजूनहि चतुष्पाद प्राण्यांच्या मूळच्या व प्राचीन हातांच्या योजनेचा प्रतिनिधी आहे असें म्हणावें लागतें. उदाहरणार्थ, लांबलांब नळकंड्यासारखी हाताच्या बोटांची रचना. बहुतेक सर्व सस्तन प्राण्यांस अशाच तऱ्हेचे पण थोडेफार बदललेले असे पाय आढळतात. वानर सोडल्यास प्रत्यक्ष हात असे फक्त कांहीं किडे खाणाऱ्या प्राण्यांत, कांगारू सारख्या पिल्लांना ठेवण्यासाठीं पिशव्या असलेल्या प्राण्यांत, कांहीं सरपटणाऱ्या प्राण्यांत, व बेडकांसारख्या जमीन व पाणी दोहोंवरहि रहाणाऱ्या प्राण्यांतच सांपडतात.

मानवी हाताचें स्वत्व किंवा व्यक्तित्व आकारशास्त्राच्या नियमाप्रमाणें शोधूं लागल्यास तें निष्फळ होईल. शरीररचनाशास्त्रज्ञ रचनेंतील फरक ओळखील, प्रमाणबद्धता पाहील, किंवा इतर सूक्ष्म गोष्टींचें निरीक्षण करील– चामडीच्या रंगांतील किंवा जाडींतील फरक, रक्तवाहिन्या, मज्जातंतू, स्नायु किंवा स्नायुपुच्छ यांच्या रचनेंतील बदल व फरक इत्यादि– पण या सर्वांचा संबंध हाताच्या विशिष्ट मानवी गुणांशीं किंवा त्याच्या संवेदनाक्षमतेशीं जोडतां येणार नाहीं. शरीररचनाशास्त्राच्या सहायानें वैयक्तिक रूपरेखा ओळखतां येत नाहीं, तर निर-



अनुक्रमणिका








निराळया जातीच्या सर्वसामान्य आकाररचनाच फक्त ओळखतां येतात हें सिद्ध होतें.

### हातानें होणारें वादन

निष्णात पिआनोवादकाच्या हातांच्या चलाख, गतिमान व सफाईदार हालचालींनीं मुग्ध झालेला माणूस जर त्याच्या हातांच्या रचनेची किंवा यन्त्रणेची तपासणी करील-त्याचा आकार, सांधे किंवा स्नायुपुच्छ तपासून पाहील किंवा मायक्रॉस्कोपच्या सहायानें त्या हातांची चामडी, हाडें किंवा स्नायुपुच्छ यांची परीक्षा करून या हालचालींचा उगम शोधण्याचा प्रयत्न करील तर कांहीं निष्पन्न होणार नाहीं. अनिष्णात व वाकचगार हातांत यान्नान्नतींत कांहींहि फरक सांपडणार नाहीं. एवढेंच नव्हे तर रचना व सूक्ष्मपिंडरचनाशास्त्र ( Histology ) दृष्टया वानरांचे हात-विशेषतः न्हिसस वानरांचे हात-व मानवाचे हात यांत खूपच सारखेपणा आढळतो. फक्त न्हिसस वानरांचे हात आकारानें लहान असतात एवढेंच. अंगठा सर्व बोटांशीं जुळविण्याची क्रिया मानवी हाताचें वैशिष्ट्य मानलें जातें. परंतु अनेक जातींचे वानर व कांहीं अर्ध वानर ( Prosimians-Potto ) सुद्धां ही क्रिया मानवासारखीच, किंबहुना जास्त चांगली, करूं शकतात. म्हणून मानवी हाताची आश्चर्यकारक चलाखी व स्वतःच्या भावना प्रकट करण्याची शक्ति त्याच्या विशिष्ट रचनेवर किंवा त्याच्या यन्त्रणेच्या विशेषीकरणावर, फार काय त्याच्या विशिष्ट मज्जातंतूंच्या परिसर वितरणावर ( Peripheral innervation ) सुद्धां अवलंबून नाहीं. आतांपर्यंत उपलब्ध असलेल्या माहितीप्रमाणें माणसाच्या व वानरांच्या हातांच्या मज्जातंतूंच्या मार्गामध्यें, आंकडयामध्यें, किंवा चामडी व स्नायु यांना पुरवठा करणाऱ्या मज्जातंतूंच्या टोकांच्या रचनेंत, किंवा पुरवठयांत, कांहींहि फरक नसतो.

### हाताचा मेंदूशीं संबंध

अलीकडे थोड्या वर्षांत आपले मानवाच्या व वानराच्या व इतरहि प्राण्यांच्या मध्यमज्जातंतूसंघाबद्दलचें ( central nervous system ) व मेंदूबद्दलचें ज्ञान बरेंच वाढलें असून त्यावरून हातानें व्यापलेली मेंदूतील जागा निरनिराळ्या प्राण्यांत वेगवेगळ्या प्रमाणांत असलेली दिसून येते व यांतच मानवी हाताच्या चमत्काराची गुरुकिल्ली दडलेली आहे. शरीराच्या वजनाच्या प्रमाणांत माणसाच्या मेंदूचें ( Cerebral Cortex ) वजन जास्त असून वानराच्या मेंदूचे मानानें तो जास्त मोठा व प्रगल्भ आहे हें पुष्कळ दिवसांपासून माहीत आहे. पण त्यांत सुद्धां माणसाच्या हातानें व्यापलेली मेंदूंतील गतिवाहक व ज्ञानवाहक जागा वानराचे मेंदूत त्याच्या हातानें व्यापलेल्या जागेपेक्षां किती तरी प्रमाणांत जास्त आहे. ( माणसाच्या मेंदूची वाढ गृहीत धरून सुद्धां ) वानराच्या मेंदूत हात व पाय यांनीं व्यापलेली जागा सारखीच असून अंगठयाच्या जागेची व्याप्ति दुसऱ्या कोणत्याहि बोटाच्या जागेपेक्षां जास्त नाहीं, तर हाताचा अंगठा व पायाचा अंगठा यांच्या जागेची व्याप्ति सारखीच आढळते. माणसाच्या मेंदूत मात्र हाताच्या जागेची व्याप्ति पायाच्या जागेच्या जवळजवळ दहापट असून नुसत्या अंगठ्याची जागा राहिलेल्या चारहि बोटांनीं मिळून व्यापलेल्या जागेएवढी आहे. मानवी अंगठ्याचें स्वतंत्र व्यक्तिमत्व सर्वमान्य आहे. ज्योतिषी त्यास अहंता म्हणतात. पण हें व्यक्तिमत्व किंवा ही अहंता अंगठ्याच्या मोठया आकारावर किंवा त्याच्या विशिष्ट यंत्रणेवर अवलंबून नसून मेंदूत त्यानें व्यापलेल्या जागेच्या व्याप्तीवर व विशेषीकरणावर अवलंबून आहे.

### हाताची उत्क्रांति

हाताच्या उत्क्रांतीची आपणांस विशेष चर्चा करणें जरूर आहे. पण विशेषतः पुढील तीन

मुद्यांची चर्चा होणें जास्त जरूर आहे. (१) आपलें मानवाच्या उत्क्रान्तिबद्दलचें ज्ञान, (२) मानवी हाताची उत्क्रान्ति म्हणजे जमिनीवर चालणाऱ्या सस्तन प्राण्यांच्या नळकांड्यासारखी रचना असलेल्या हातांची उत्क्रांति, (३) मानवी मेंदूची (Cerebral Cortex) उत्क्रान्ति व त्यांतील हातानें व्यापलेल्या जागेची उत्क्रांति.

इतर होमिनाइड (मूळच्या सजातीय) प्राण्यापासून माणूस, माणूस म्हणून, नेमका केव्हां वेगळा पडला, हें सांगणें फार कठीण आहे. पण प्राणी–शास्त्रज्ञ रेमन याचें म्हणणें असें आहे कीं, प्लेस्टोसीन काळांत (पंधरा ते एकदशलक्ष वर्ष) ऑरॅंग–उत्तानसारख्या वानर जातीपासून माणूस वेगळा झाला असेल व त्याचवेळीं झाडावर चढण्यासाठीं विशिष्ट प्रकारानें वाढलेला हात पुन्हा माणसाच्या हातासारखा बनला असेल. कांहीं पुरातन मानवशास्त्रवेत्त्यांचें म्हणणें आहे कीं, मानव झाडावर न चढणाऱ्या व त्याकरतां हातापायांत विशिष्ट बदल न झालेल्या अशाच वानरांपासून जन्मला असावा. दुसऱ्या जातींच्या उत्क्रांतिप्रमाणेंच मानवसुद्धां मेंदूच्या उत्क्रांति अगोदरच पायावर ताठ उभें रहाण्याची क्रिया करूं लागला असें आतां आपण धरूनच चालतों. हा समज शरीराच्या सांगाड्याची, कटिराची किंवा जंघास्थि यांची व मेंदूचा आकार व वजन यांची तुलना करतां जास्तच दृढ होतो.

माणूस, माणूस म्हणून उत्क्रांत होण्यास बहुतेक २० किंवा ३० लक्ष वर्षांपूर्वी सुरुवात झाली असावी. पण ज्याला अग्नीचा उपयोग माहीत होऊन ओबड-धोबड कां होईना हत्यारें बनविण्याची कला अवगत झाली आहे असा माणूस मात्र आठ लक्ष वर्षांपूर्वींच पहिल्यानें आढळतो. म्हणजे पृथ्वीच्या इतिहासाच्या दृष्टीनें मानव हा फार अलीकडील प्राणी आहे. परंतु प्रस्तरीभूत प्राचीन मानवाच्या सांगाड्यावरून असें दिसून येतें कीं, पुरातनकाळीं सुद्धां माणसाचा हात आकार व रचनेच्या दृष्टीनें हल्ली सारखाच विशिष्ट मानवी हातच होता.

सुमारें २५० कोटी वर्षांपूर्वीं जमिनीवर चालणाऱ्या बेडकासारख्या अनेक पृष्ठवंशी (vertebrates) प्राण्यांना हात होते, सुप्रसिद्ध टॅम्वेक दगडावर ओबड-धोबड अशा लहान मुलाच्या हाताच्या आकाराचा ठसा आढळतो. २३० कोटी वर्षांपूर्वीं अत्यंत प्राचीन असे सस्तन प्राणीसुद्धां जंगलामध्यें झाडावर चढतांना व उतरतांना आपला अंगठा इतर बोटांशीं जुळवून हात वापरीत होते असें दिसतें. १५० कोटी वर्षांपूर्वीं किडे खाणाऱ्या प्राण्यांच्या पासून सुरवात होऊन १०० कोटी वर्षांपूर्वीं आदि वानरें जन्माला आलीं. त्यांच्या व अलीकडील वानरांच्या हातांत मनगटाच्या हाडांच्या संख्येंतच फक्त थोडासा फेर आहे. मानव, व मानव सदृश (Anthropoid) वानरें यांच्या मनगटांतील कांहीं हाडें एकमेकांत मिळून गेलीं आहेत. म्हणजे हात हा अनादि कालापासून फारसा कांहीं बदललेला नाहीं. इथून पुढें झालेल्या उत्क्रान्तीच्या कालांत बऱ्याचशा वानरांचे हात बदलत गेले, परंतु मानव व ऱ्हिसस वानरासारख्या कांहीं जातींच्या वानरांचे हात आकार किंवा रचना दृष्ट्या बदलले नाहींत. वानरें म्हणून प्रगल्भ दशेस पोंचलेलीं गोरिला, ऑरॅंगउत्तान किंवा चिंपाझी यांचे हात मात्र त्यांच्या विशिष्ट गरजांप्रमाणें बदलत जाऊन झाडावर चढण्यास उपयुक्त हात तयार झाले व म्हणूनच माणसाच्या व त्यांच्या हातांतील सादृश्य मूलभूत ठेवणींत नव्हे तर चढण्या-सारख्या कामाच्या उपयुक्ततेच्या बाबतींत बऱ्याच प्रमाणांत कमी झालें.

## हाताचें पुराणत्व

याप्रमाणें हाताचा आकार हा विशिष्ट मानवी हात किंवा मानवी मेंदू यांचेपेक्षां जुना असून पाण्यांत न रहाणाऱ्या पृष्ठवंशी जातींच्या सर्व प्राण्यांत

आढळतो. म्हणून वर म्हटल्याप्रमाणें मेंदू उत्क्रान्त होत जाऊन मानवीदशेस पोंचत असतांना त्यांत हाताला जी विशिष्ट जागा व व्याप्ती मिळाली त्यावरूनच हाताला मानव्य प्राप्त होऊन तो विशिष्ट म्हणजे मानवी हात बनला. हं केव्हां झालें ?

याबाबतींत विश्वसनीय असा फारसा पुरावा आपलेजवळ नाहीं. मानवसदृश वानरें व आदि मानव यांच्या मेंदूचा आकार किंवा त्यांच्या डोक्याच्या कवट्यांचें घनफळ हा एक पुरावा होय. याशिवाय प्रस्तरीभूत मेंदूंचे ठसे किंवा निरनिराळ्या उत्क्रांतीच्या काळांत माणसानें बनविलेलीं अवजारें व शस्त्रें व त्यांचा होणारा ओबडधोबड किंवा सफाईदार वापर यावरून कल्पनेनें काढलेले निष्कर्ष हा दुसरा पुरावा होय.

## मानवपूर्वज वानराच्या जाती

प्रोकान्सल आफ्रिकानस हा एक मानवसदृश वानर एक कोटी वर्षांपूर्वी होऊन गेला. तो दोन पायावर ताठ चालत असून त्याला झाडावर चढतां येत नव्हतें. त्याचे दुधाचे दांत खूपच घासलेले सांपडतात. यावरून त्याची बाल्यावस्था माणसासारखी लांबलचक होती असा निष्कर्ष निघतो. त्याच्या मेंदूचें वजन ४०० ग्रॅम्स होतें. सुमारें २० ते १० लाख वर्षांपूर्वी ऑस्ट्रेलोपिथिसित जातीच्या वानरांच्या मेंदूचें वजन ६०० ग्रॅम्स असलेलें दिसून येतें. सध्यां अस्तित्वांत असलेल्या मानवसदृश वानरांच्या मेंदूचें वजन साधारण एवढेंच किंवा थोडेसें कमीच भरेल. हा वानर पॅव्हिन व इतर जातींच्या वानराच्या डोक्यांत दगड घालून, त्यांना ठार मारून, त्यांचें कच्चें मांस खात असे, असें डार्टचें मत आहे. मानवाच्या मानव म्हणून उत्क्रान्तीस इथूनच सुरुवात झाली असें हर्बरचें मत आहे. १९४७ सालीं आस्ट्रेलो-पिथिसितची कवटी सांपडली असून तिचें माणसाच्या कवटीशी बरेंच साम्य असल्याचें आढळतें. ४ लाख वर्षांपूर्वी मानव अग्नीचा उपयोग करीत असून कांहीं अवजारें पण वापरीत होता असें धरून चालण्यास हरकत नाहीं. त्यावेळीं त्याच्या मेंदूचें वजन जवळजवळ १००० ग्रॅम्स होतें. सिनेन्थ्रोपसचा चेहरा आधुनिक मानवासारखाच वाटोळा होता असें दिसतें. ९० हजार वर्षांपूर्वी म्हणजे निॲण्डरथल-काळांत मेंदूचें वजन १५०० ग्रॅम्म झालेलें होतें. बरीचशीं अवजारें वापरांत असून लाकडी कामास पण सुरुवात झाली होती. अग्नीचा वापर तर सर्रास दृष्टीस पडतो. या काळांतील कांहीं सांगाडे सांपडले असून त्यांचे हात सध्यांच्या माणसाच्या हातासारखेच आहेत. ४० हजार वर्षांपूर्वी जे निरनिराळे मानव वंश होऊन गेले त्यांनीं केलेलें गुहेंतील चित्रलेखन व शिल्पकला पण दृष्टीस पडतात. ऑस्ट्रेलोपिथिसितच्या हाताच्या तळव्याचें पहिलें लांब हाड, एक बोटाचें पेरें व मनगटाचें एक हाड व सिनॅनथ्रोपसच्या मनगटाचें अर्धचंद्राकृती हाड हे दोन सोडल्यास २० लक्ष वर्षांमध्यें प्रस्तरीभूत ठशावरून मिळा-लेल्या माहितीप्रमाणें मानवी हातांच्या उत्क्रांतीबद्दल कोणतीहि माहिती उपलब्ध नाहीं. या पुराव्यावरून गेल्या १५ लक्ष वर्षांत हाताच्या रचनेंत अल्पसाहि बदल झालेला सिद्ध होत नाहीं.

## माणसापेक्षां त्याचा हात जुना

सारांश, हाताच्या उत्क्रान्तिविषयीं आपल्याला पुढील गोष्टी माहीत आहेत : माणसाचा हात माणसा-पेक्षां जुना आहे. त्याची रचना व आकार हीं सुमारे २५० कोटी वर्षांची आहेत. माणसाच्या हातांची रचना विशिष्टीकरण न झालेली पुरातन आहे. झाडा-वर चढण्यास तो उपयुक्त नाहीं. माणसाचा हात हा त्याचे मेंदूपेक्षां सुद्धां जुना आहे. परंतु सुमारे पांच लक्ष वर्षांपूर्वी जेव्हां माणसाचा मेंदू उत्क्रान्त झाला तेव्हांच हा पुरातन हात आकार व रचना यांत फारसा बदल न होता विशिष्ट मानवी हात बनला.

म्हणजे उत्क्रान्तीच्या फार मोठ्या कालावधींत सरळ ताठ चालण्याची कुशलता प्राप्त झाल्यामुळें








पुढील पायांना ( म्हणजेच हातांना )– पकडण्याची, स्पर्श करण्याची, कामें करावीं लागून त्यांचा जास्त चांगला उपयोग होऊं लागला. परंतु मेंदू हा मानवी मेंदू म्हणून उत्क्रांत झाला तेव्हांच हात हा अत्यंत उच्च दर्जाचा कार्यक्षम. परिणामकारक व मनोव्यापारांतील संवेदना व ग्रहणशक्ती, इच्छा व कर्म या परस्परांतील आघातप्रत्याघात दर्शविणारा व आपल्या हालचालींनीं लाक्षणिक अर्थबोध करून देणारा अवयव बनला. जमिनीवर चालणाऱ्या सस्तन प्राण्यांच्या पायांची (हातांची) रचना व ती बदलण्याची शक्यता कायम होती. पण माणसांचा मेंदू प्रगल्भ झाला तेव्हांच हाताच्या कामांत खरा बदल झाला. सर्व शरीराशीं तुलना करतां हात फारच लहान आहे. पण त्यानें व्यापलेली मेंदूतील जागा पुष्कळच मोठी आहे. म्हणूनच आकार व रचना यांचा विचार न करतां आपण जेव्हां हातानें व्यापलेली मेंदूतील जागा विचारांत घेतों तेव्हांच हाताच्या व्यवहाराचा खरा अर्थ समजतो.

---










श्री. न. वि. गाडगीळ ( चंदिगड )

# माझी जीवन कथा --समालोचन

चरित्राचें अगर आत्मचरित्राचें समालोचन करतांना कांहीं गोष्टी लक्षांत ठेवणें आवश्यक आहे. विशेषतः ज्या व्यक्तीचें जीवन अधिक सार्वजनिक असतें त्या व्यक्तीच्या चरित्राबद्दल अगर आत्मचरित्राबद्दल विचार करतांना समालोचनविषयक प्रस्थापित झालेलीं, प्रतिष्ठा पावललीं, कांहीं मूल्यें लक्षांत ठेवलीं पाहिजेत. जुन्या व इतिहासजमा झालेल्या वादांना समालोचनाच्या योगें पुनर्जन्म मिळूं नये ही काळजी घेतली पाहिजे. संबंधित चरित्रनायकानें जें कांहीं केलें असेल त्याचें मोजमाप करतांना, त्याच्या समकालीन असलेल्या संकेतांना, समजुतींना व शिष्टाचारांना धरून तें केलें पाहिजे. त्यापूर्वीच्या काळांतील अगर त्यानंतरच्या काळांतील मूल्यांनीं चरित्राकडे पाहाणें हें सर्वस्वी न्याय्य होणार नाहीं. भौतिक जगांतील कार्य-कारणभावाइतकी निश्चितता सामाजिक व राजकीय जीवनांत नसते, हें खरें; तथापि कार्यकारणभावा-व्यतिरिक्त कांहीं तरी स्वयंभू रीतीने, अकल्पित रीतीने इतिहास घडत जातो. सामाजिक जीवन सारखें मार्ग-क्रमण करीत असतें, हेंहि खरें नाहीं. घटनेंतील संदर्भ लावतांना, सामाजिक परिस्थिति, वैचारिक परंपरा, सांस्कृतिक पार्श्वभूमि या सर्व लक्षांत घेतल्या पाहिजेत. त्याच प्रमाणें पुष्कळ वेळां, चालू इतिहास म्हणजे शब्द सोडलेला घडा वाटतो. त्याचा संपूर्ण अन्वयार्थ लावण्यासाठीं अनेक दृष्टींनीं विचार करावा लागतो. न्यायाधीश हा न्याय देण्यासाठी शपथ घेवून न्याया-सनावर बसलेला असतो. तथापि तो समाजांतच राहात असल्याकारणानें समाजांतील सिंधूचा तो एक बिंदू असल्याकारणानें जे कांहीं सामाजिक गुणदोष असतील ते सर्व त्याच्या मनामध्यें, त्याला कल्पनाहि नसतांना, भूमिगत रीतीने वावरत असतात. तथापि न्यायासनाची अशी एक परंपरा व प्रतिष्ठा असते कीं तिचा अभिमान त्याला असतो. व त्या अभिमानानें ज्ञात झालेल्या पूर्वग्रहांना, साक्षात्कार झालेल्या विकल्पांना तो बाजूला सारत असतो. तीच गोष्ट समालोचकाने करावयाची असते.

कर्नाटकसिंह गंगाधरराव देशपांडे यांनी लिहिलेली जीवनकथा ' माझी जीवन कथा ' या नांवानें प्रसिद्ध झाली आहे. गंगाधरराव देशपांडे यांची कामगिरी कर्नाटकांत व महाराष्ट्रांत मान्यता पावलेली आहे. भारताच्या स्वातंत्र्याच्या लढ्यांत त्यांनी केलेली काम-गिरी कोणीहि कमी लेखूं शकत नाही. कर्नाटकाच्या गेल्या ७० वर्षांच्या इतिहासांतून गंगाधररावजींचा भाग वगळला तर जें चित्र दिसेल तें अधुरें व अपुरें असेल. ५० वर्षेपर्यन्त त्यांनी कर्नाटकाच्या राजकारणांत प्रामुख्यानें भाग घेतला. कर्नाटकाच्या राजकारणाचे ते पंचप्राण होते. त्या दृष्टीने त्यांची ' जीवन कथा ' ही ऐतिहासिक महत्त्वाची, विद्यमान पिढीला अभिमान वाटावा व भावी पिढ्यांना मार्गदर्शक ठरावी अशीच अपेक्षा कोणी केल्यास तें गैर नाही. ही ' जीवन कथा ' म्हणजे लेखकानें तुरुंगांत असतांना ज्या आठवणी सांगितल्या त्या होत. गंगाधररावजींनी आपल्या आयुष्यांत जें जें कांहीं पाहिलें, जो अनुभव घेतला व ज्यासंबंधीं विचार केला त्या सर्वांचा इति-हास त्यांत आहे. व्यक्तीच्या जीवनांतील घडामोडीचा इतिहास द्विविध असतो-एक त्याच्या व्यक्तिगत जीवना-संबंधीं व दुसरा त्याने सार्वजनिक जीवनांत जो भाग घेतला असेल त्याबाबत. व्यक्तिगत जीवनांतील अनु-भवसुद्धां तत्कालीन व संबंधित परिस्थितीच्या संबंधां-तच पाहावयाचे असतात. हे अनुभव तत्कालीन परि-स्थिति कशी निर्माण झाली व तिला कसकसा आकार येऊं लागला या दृष्टीनें महत्त्वाची असते. व्यक्तीचें जीवनहि सामाजिक जीवनाचा एक भाग असतें. व्यापक जीवनाचा एक अंश असतें. मनुष्य जन्मतो तो समाजांतच. त्या समाजजीवनाचे जे गुणदोष अस-तात त्याचे परिणाम जन्माच्या पहिल्या क्षणापासून त्याच्यावर होत असतात. म्हणून मनुष्याचा जन्म व त्याचें बालपण, त्याचें शिक्षण, त्याच्यावर झालेले संस्कार, त्याचें लग्न इत्यादि गोष्टी समाजाच्या इति-हासाचे दृष्टीने महत्त्वाच्या असतात. नानाविध व्यक्तींच्या जीवनांतील अनुभवावरून तत्कालीन सामा-

जिक समज व श्रद्धा इतिहासकार निश्चित करीत असतो आणि जव्हां व्यक्ति आपले अनुभव लिहून ठेवते, तेव्हां अशा लिखाणांतून इतिहास लिहिणाऱ्याला सामुग्री मिळत असते.

या दृष्टीने विचार करतां या 'जीवन कथ'तील पहिलीं १०० पानें मोठीं मनोरंजक व वाचनीय झालीं आहेत. १८७० च्या काळांत महाराष्ट्रांत व त्याच्या दक्षिणेला जोडून असलेल्या कर्नाटकांतील भागांत सामाजिक जीवन कसें होतें, हें लक्षांत येण्यासारखें आहे. १८१८ मध्ये मराठी सत्ता नष्ट झाली तेव्हां महाराष्ट्रीय मनाला असलेला पहिला धक्का जबरदस्त होता. मराठ्यांचा अंमल पार कावेरीपर्यंत होता आणि त्यामुळें तिकडील अधिकारी देशपांडे, देसाई, व अन्य इनामदार, वतनदार, ही मंडळी एकतर महाराष्ट्रीय असत अगर त्यांच्या संस्कृतीच्या परिणामाखालीं वावरत असत. राजकीय अंमल ज्याचा त्या समाजाचा अगर त्या शासनाच्या शासकवर्गाच्या संस्कृतीचा व सामाजिक मूल्यांचा परिणाम शासितांच्या सामाजिक व सांस्कृतिक क्षेत्रांतहि न कळत होत असतो. महाराष्ट्रामध्यें स्वातंत्र्याबरोबर वैभव समाप्त झालें होतें तरी अभिमान गेला नव्हता. काप गेले होते, भोकें राहिलीं होतीं. पण फार थोड्या वर्षांत महाराष्ट्रामध्यें पुनरुत्थापनाचें वैचारिक कार्य सुरू झालें. पाहातां पाहातां सत्तानाश झाला आणि मूठभर परक्यांनी "वारुळास भक्षिलें मुंग्यांनीं" अशी स्थिति झाली ती कां याचा विचार सुरू झाला.

५७ च्या बंडापूर्वीच महाराष्ट्रीय विचारवंतांनी पुनरुत्थापनाचा मार्ग कोणता याचा सामान्यपणे विचार केला होता. आधुनिक जगाचा इतिहास वाचून आधुनिक संस्कृतीशीं परिचय होत गेल्यामुळें दृष्टीला व्यापकता आली. विचार अंतर्मुख होऊन समाजांतील दोष दूर केल्याशिवाय पुनरुत्थापन नाहीं, याची खात्री होत होती. पुनरुत्थापनाचें मुख्य व महत्त्वाचें शस्त्र म्हणजे शिक्षण ( सामान्य व राजकीय ) हें मान्य झालें. ५७ च्या बंडापूर्वीच मुंबईस शिक्षणविषयक व राजकीय संस्था निर्माण झाल्या. अनेक इंग्रजी ग्रंथांचे अनुवाद होऊं लागले. कांहीं तरी आततायी अगर साहसी कृत्यें करून पुनरुत्थापन होणार नाहीं, राजकीय स्वातंत्र्य मिळणार नाहीं हा विचार बोलला जाऊं लागला. ५७ च्या बंडांत ज झालें तें मर्यादित अर्थानें स्वातंत्र्याचा पहिला प्रयत्न म्हणतां येईल. पण त्या स्वातंत्र्याचा आशय वैभवहीन झालेल्या कांहीं राजेरजवाड्यांसाठीं होता हें मान्य करणें जरूर आहे. त्या वेळच्या समजुतीप्रमाणें राजा म्हणजे राज्य, आणि प्रजा ही राजाच्या मागें आहे असें गृहीत धरलें जाई. आधुनिक लोकशाही स्वातंत्र्याच्या व पार्लमेंटरी राज्यपद्धतीच्या कल्पना ५७ च्या आधीं मराठी मुलुखांत हळुहळू पसरत होत्या आणि त्यामुळें म्हणा अगर अन्य कांहीं कारणामळें म्हणा, ५७ च्या बंडांत महाराष्ट्रांत म्हणण्यासारखें कांहीं झालें नाहीं. कर्नाटकांतहि नरगुंद येथील घटना सोडली तर कांहीं विशेष घडलें असें म्हणतां येणार नाहीं. ५७ पासून कॉंग्रेसची स्थापना होईपर्यंत म्हणजे सुमारे ३० वर्षांच्या काळांत महाराष्ट्रांत वैचारिक क्रांति सुरू झाली. एकदां कुठल्याहि क्षेत्रांत क्रांति सुरू झाल्यानंतर तिचा परिणाम समाजांतील सर्व क्षेत्रांत होत असतो. नवे सामाजिक विचार महाराष्ट्रांत विस्तार पावूं लागले. त्या विचारांचा परिणाम कर्नाटक प्रान्तावर होत होता हें उघड आहे. त्या काळांत शिकलेल्या व प्रगतिपर विचार करणाऱ्या लोकांच्या मनांत जें येत असे तेंच नेमकें गंगाधररावाच्या मनांत येत असे, हें पहिलीं १०० पानें वाचल्यानंतर स्पष्ट होतें. कुटुंबीय जीवन, शिकलेलीं मुलें नव्या विचारांचीं; वृद्ध मातापितरें जुन्या मतांचीं, पति शिकलेला, पत्नी अशिक्षित; नवें साहस करण्याकडे तरुणांची प्रवृत्ती, तर जुन्यांची प्रवृत्ती स्थितिविद्ध राहाण्याकडे इत्यादि सामाजिक संघर्ष व द्वंद्वें या 'जीवन कथेंत' दिसून येतात. तीं व्यक्तिगत असलीं तरी त्यांना प्रातिनिधिक स्वरूप आहे. हीं १०० पानें वाचतांना जणूं कांहीं आपण जें पाहिलें, भोगलें, तेंच कोणी तरी लिहून ठेवलें आहे, असें आज जीं साठी उलटलेलीं माणसें आहेत त्यांना वाटतें. गंगाधररावजींची भाषा इतकी सहज, सुबोध, अकृत्रिम, आहे की जणुं कांहीं वाचकाला आपणच बोललेलें पुन्हा ऐकत आहोंत असें वाटतें.

गंगाधररावजी हे केवळ सामाजिक सुधारणावादी होते असें नव्हे. लहानपणापासूनच कांहींतरी सार्वजनिक कार्य आपण करावें, अशी प्रवृत्ती त्यांच्यांत तत्कालीन वर्तमानपत्रें वाचून झाली, हें उघड आहे. सार्वजनिक










जीवनाच्या दृष्टीने त्यांच्या जीवनाचे कालपरत्वें तीन भाग पडतात. पहिला भाग साधारणपणें राजकीय कंठ फुटल्यापासून १९०८ पर्यंतचा. दुसरा भाग १९०८ पासून १९२० पयत म्हणजे गांधीजींचें युग भारतीय राजकारण पंचागांत सुरू होईपर्यंत. आणि तिसरा भाग म्हणजे १९२० पासून १९४७ पर्यंत; कारण ४७ च्या सुमारास गंगाधरराव राजकारणापासून निवृत्त झाले म्हणजे त्यांत प्रत्यक्ष भाग त्यांनीं घेतला नाहीं. पण त्यांचा अनुभव व सल्लामसलत जे इच्छित त्यांना मिळे. १९०८ पर्यंत पहिल्या कालखंडांत जें त्यांनीं केलें तें त्यावेळीं प्रचलित असलेल्या मूल्यांना धरून व जें सार्वजनिक कार्य ते करीत होते तें, जें महाराष्ट्रांत दिसून येत होतें त्याच नमुन्याचें होतें. किंबहुना मराठ्यांचा राजकीय अंमल कर्नाटकांत नाहींसा झाला असला तरी कर्नाटकाच्या सार्वजनिक जीवनावर टिळकांच्या मृत्यूपर्यंत महाराष्ट्राच्या वैचारिक नेतृत्वाची छाप होती असें म्हणण्यास हरकत नाहीं. तोंपर्यंत कर्नाटकांतील कार्यकर्त्यांना मिळणारी प्रेरणा पुण्यनगरींतून मिळत होती असें म्हणणें योग्य होईल. किंबहुना हिंदुस्थानच्या १८९६ पासून ते १९०८ पर्यंतच्या राजकारणावर टिळकांचा प्रभाव होता अशी इतिहास साक्ष देत आहे. लाल, बाल व पाल या त्रिमूर्तींनीं भारताला बल दिलें, ही कव्योक्ति यथार्थ आहे. या त्रिमूर्तीपैकीं वयाने, विद्येनें व त्यागानें लोकमान्य हे श्रेष्ठ होते हें कोणीहि अमान्य करणार नाहीं. टिळकांपासून गंगाधररावांना प्रोत्साहन मिळालें हें त्यांच्या जीवन कथेंतून स्पष्ट दिसतें. केसरीतील लेख वाचून आपणहि चळवळीत पडावें अशी त्यांना प्रेरणा झाली. मग ते प्रथम गोखले यांना भेटले व नंतर गोखले यांनी त्यांचा स्वभाव व प्रवृत्ती ओळखून त्यांना टिळकांकडे जाण्यास सांगितलें. त्याप्रमाणें टिळकांना ते भेटल, संपूर्णपणें सार्वजनिक कार्यांत पडण्याचा त्यांचा विचार टिळकांना आवडला. त्यांनीं त्यांना गोखल्यांकडे जाण्यास सांगितलें, " त्यांच्याकडे आधींच जाऊन आलों आहे व त्यांच्या सांगण्यावरूनच आपणांस भेटत आहे, " हें सांगितल्या नंतर टिळकांनी त्यांना जो उपदेश केला त्याचा परिणाम गंगाधररावजी हे संपूर्णपणें सार्वजनिक कार्य करूं लागले ' सार्वजनिक कार्य म्हणजे वर्षांतून दोन चार भाषणें करावीं, काँग्रेसच्या अधिवेशनाला हजर राहावें, व इतर वेळीं व्यवसाय करावा असें १९०५ पर्यन्त त्याचें स्वरूप होतें. संपूर्णपणें सार्वजनिक सेवेला वाहून घेण्याची कल्पना गोखल्यांची आणि तिचें मूर्त स्वरूप म्हणजे भारत सेवक समाज. टिळकहि १८९६ नंतर संपूर्णपणें सार्वजनिक कार्य करीत होते, तथापि वृत्तव्यवसायहि ते चालवित होते. दोन्ही विभूतींच्या सल्लामसलतीनंतर गंगाधररावजींनी ज पाऊल उचललें व ज्या मार्गांचा स्वीकार केला त्यांतून ते परावृत्त झाले नाहींत. खंत अगर खेद त्यांनीं कधींच दाखविला नाहीं. वर्तमानपत्रेंहि काढलीं. किंबहुना कर्नाटकांतील सार्वजनिक जीवनाला प्रभावी करण्यांत आपलें सर्वस्व त्यांनी वेचलें. गंगाधररावजींची प्रेरणा म्हणजे देशासाठीं अधिकांत अधिक करावयाचें व जो तसें करीत असेल त्याच्या मागें जावयाचें. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे गंगाधररावजींचा राजकीय आत्मा निष्ठाप्रधान होता. आणि म्हणून टिळकांच्या पश्चात् टिळकांच्या तथाकथित अनुयायांनीं तात्त्विक चर्चा करीत करीत निष्क्रियता दाखविली त्याप्रमाणें गंगाधररावजींनीं केलें नाहीं. त्यांना—गांधी हेच टिळकांचें कार्य पुढें चालवित आहेत असें वाटत होतें आणि म्हणून गांधींनी नव्या युगाचें निशाण उभारतांच ते त्या खालीं दाखल झाले. फावल्यावेळीं सार्वजनिक कार्य करण्याची वळ निघून गेली, आतां सर्वस्वी त्या कामालाच वाहून घेणारीं माणसें हवीं आहेत, ही टिळकांची शिकवण त्यांनी आपल्या आयुष्यांत पूर्णपणें आत्मसात् केली.

१९०८ सालीं टिळकांना ६ वर्षांची शिक्षा झाली, त्यानंतर टिळकांची सुटका होईपर्यंत भारतांतील राजकारणाला स्तब्धता आली, त्याजबरोबर महाराष्ट्रांतील राजकारणालाहि स्तब्धता आली, पुढाऱ्यांच्या अभावीं संघटन शिथिल होतें. गंगाधररावजींनी कांहीं तरी काम चालूं करावें या दृष्टीनें प्रयत्न केला पण महाराष्ट्रीय नेत्यांकडून त्यांना कांहींहि उत्तेजन मिळालें नाहीं. उलट नेमस्तपणाने वागण्याचा उपदेश त्यांना करण्यांत आला. १९०८ पासून १४ पर्यंतच्या काळांत इच्छा नसतांना गुप्त चळवळीशी त्यांचा संबंध आला; गुप्त चळवळीचे काय परिणाम होतात याची मनोरंजक हकिगत ' क्रान्तिकारकाशी संबंध ' या प्रकरणांत वाचकाला पाहावयास मिळते. संस्थानी राजकारण कसें चालत होतें, ब्रिटिशांच्या कारवाया त्यांच्या मार्फत



अनुक्रमणिका






कशा चालत असत, हाहि इतिहास त्याच प्रकरणांत पहावयास मिळतो. त्या काळच्या पोलिसांचें वर्तन कसें होतें व कोणत्या नीचतेला ते जात होते, याचा इतिहास पहावयास मिळतो. किती हुशारीनें व सावधानपणानें त्या काळच्या सार्वजनिक कार्यकर्त्यांना वागावें लागत होतें हेंहि दिसून येतें. श्रीधर खरे व गोविंदराव याळगी यासारख्या हुशार व त्यागी देशभक्तांची कामगिरी वाचून कौतुक करावेंसें वाटतें. असलीं माणसें ज्या गृहस्थानें आपलीशीं करून घेतलीं तो सामान्य नव्हता, कांहींतरी विशेष होता, हें म्हणणें युक्त ठरतें. उघड व गुप्त राजकारण यांतील धोके व धक्के त्या काळच्या पुढाऱ्यांना खावे लागले. ही एक अपरिहार्य अशी त्या वेळच्या राजकारणाची बाजू होती हें उघड आहे. त्या काळांत ज्या कांहीं व्यक्तींनी गंगाधररावजींच्या विरुद्ध कारस्थानें केलीं त्यांचाच पुरस्कार पुढें राजकीय क्षेत्रांत त्यांनी केलेला पाहिला म्हणजे देशाच्यासाठी व्यक्तिगत प्रतिष्ठा अगर पूर्वग्रह ते बाजूला सारत ही गोष्ट दिसून येते. या काळांत कांहीं ' अव्यापारेषु व्यापार ' त्यांनीं केला, त्यांनीं ज्याच्यावर विश्वास टाकला त्यांनींच त्यांना फसविलें; पोलीशांशीं सरळ वागत असतांना सुद्धां शत्रुत्व पतकरावें लागलें व त्याचा परिणाम खुनाच्या खटल्यांत ते कसे सांपडले व कसे सुटले ही हकीगत वाचतांना त्यांच्या धैर्याबद्दल व सावधानपणाबद्दल अभिमान वाटतो. त्याजबरोबर पोलीसांची वक्र बुद्धि नीतिशून्यता याबद्दल तिटकारा वाटतो. टिळक सुटून येईपर्यंत कांहीं विशेष राजकारण ते करूं शकले नाहीत याचें कारण टिळक अनुयायांची कृतिशून्यता हेंच आहे. त्यांच्याविरुद्ध ज्या कटकटी उत्पन्न झाल्या त्यांना तोंड देतां देतां १९१४ साल उजाडलें व टिळक ज्या दिवशीं सुटून आले त्याच्या दुसऱ्या दिवशीं खुनाच्या खटल्यांतून त्यांचीहि सुटका झाली. ' पुनश्च हरिः ओम् ' म्हणून टिळकांनीं कार्याचे मोर्चे बांधण्यास सुरुवात केली, त्यांत गंगाधररावजी हे त्यांचे तानाजी ठरले. टिळकाबद्दल त्यांच्या मनांत अत्यंत आदर होता, पुढें जेव्हा अनेक टीकाकार त्यांना टिळकद्रोही म्हणूं लागले त्या बाबत गंगाधररावजी म्हणतात की, " टिळकांच्या पश्चात् हिंदी राजकारणाचीं मुख्य सूत्रें गांधींच्या हातीं गेलीं त्यावेळीं व तेव्हांपासून आजपर्यंत गांधींशीं मी यथाशक्ति सहकार्य करीत आहे. मी टिळकमार्गाला सोडलें असा आरोप अनेक लोक माझ्यावर करतात, पण माझ्या मतें १९०६ पासून आजतागायत टिळकांच्या सहवासामुळें ज्या ध्येयांची मी माझ्या अंतःकरणांत स्थापना केली होती, त्यापासून मी च्युत झालों आहे असें मला वाटत नाहीं. "

टिळकांनी सुटकेनंतर पुन्हां राजकारणें करण्यास सुरुवात केली. कॉंग्रेस संस्थेची प्रतिष्ठा व शक्ति याची जाणीव त्यांना पूर्णपणें होती. त्या दृष्टीनें हळूहळू आपल्या पूर्वीच्या सहकार्यांचे मताचा ठाव घेत होते. हें त्यांचें धोरण अनेकांना पसंत नव्हतें ही गोष्ट या ' जविन कथे'त स्पष्ट केली आहे. तथापि टिळकांचें व्यक्तिमत्व हें येवढें विशाल व प्रभावी होतें कीं हळूहळूं त्यांनीं आपल्या मताकडे सहकाऱ्यांना ओढून घेतलें, किंबहुना टिळकांना सोडून आपल्याला प्रभाव व प्रतिष्ठा नाहीं, याची कदाचित् जाणीव झाल्याने त्यांनीं तसें केलें असेल. तथापि एकदां कार्याला सुरवात केल्यानंतर स्वस्थ बसणें अगर अन्यांना स्वस्थ बसूं देणें ही टिळकांची नीति नव्हती. कार्याच्या दृष्टीनें पायां पडण्यापासून डोक्यावर टोला हाणण्यापर्यंत प्रसंगानुकूल व्यवहारी दृष्टिकोन टिळकांचा असल्यानें त्यांनीं महायुद्धाची नौबत वाजल्याबरोबर एक पत्रक काढून सरकारबद्दल आपलें मत, आपलें राजकीय धोरण, भारताचें युद्धविषयक कर्तव्य, याविषयीं एक निवेदन प्रसिद्ध केलें. सदरहू पत्रकांतील कांहीं विधानें गंगाधररावांना पसंत नव्हतीं, हें त्यांनी नमूद केलें आहे. तथापि पुढें जें होमरूलचें आंदोलन झालें त्यांतून पुढें राजकीय प्रगतीची तीव्रता दिसून आली. त्यासाठीं लोकमान्यांचें निवेदन ही एक राजकीय आवश्यकता होती असें मानण्यास हरकत नाहीं. होमरूलची चळवळ काढून ती संघटित करूनसुद्धां कॉंग्रेस प्रवेशाची तयारी टिळकांनी चालविली होती. सगळ्या अटी पत्करून टिळकांनी कॉंग्रेसप्रवेश केला. १९१६ च्या लखनौच्या कॉंग्रेसमध्यें त्यांनी राजकारणाला निराळें वळण लावलें. कॉंग्रेस प्रवेशाच्या झालेल्या चर्चेत गंगाधररावजींनी काय भाग घेतला व कोणता दृष्टिकोन ठेवला हें पाहिल्यावर तर त्यांनी जें तत्व सांगितलें आहे तें खरोखर मोलाचें आहे. गंगाधरराव म्हणतात, " नाजूक प्रसंगीं जेव्हां महत्त्वाच्या प्रश्नासंबंधाने मतभेद उत्पन्न होतो त्यावेळीं प्रत्येकाला आपलें मत सांगण्याचा हक्क असला पाहिजे.



अनुक्रमणिका






तथापि अखेरीस टिळकांसारख्या पुढाऱ्यांच्या मताला महत्व देऊन त्याप्रमाणें वागण्यांतच राष्ट्रहिताच्या दृष्टीनें शहाणपणा आहे. सर्वांना तत्त्व पटत नाहीं म्हणून चर्चा व्हावी हें बरें; पण निर्णय मात्र नेत्याच्या दृष्टिकोनानें व्हावा." विचारस्वातंत्र्याबरोबर आचार-निष्ठा व संघटन दृढ ठेवण्याची इच्छा या गोष्टी असल्या पाहिजेत. होमरूल चळवळीच्या निमित्तानें गंगाधररावजींनी जें आंदोलन केलें, ज्या परिषदा भरविल्या, जीं व्याख्यानें दिलीं, त्या सर्वांचा इतिहास या जीवनकथेंत आपल्याला मिळतो. महाराष्ट्रांतील टिळकांच्या अनुयायासंबंधानें बोलतांना गंगाधररावजी लिहितात, "टिळकांच्याबद्दल लिहितांना किंवा बोलतांना गांधींवर तोंडसुख घेतल्याशिवाय राहवत नाहीं. जणूं काय त्यांच्या मतें गांधींची निंदा केल्याशिवाय टिळकांचे उत्कट गुण सांगतांच येत नाहींत." आजहि महाराष्ट्रांतील राजकारणांत ही प्रवृत्ती वाढलेली दिसून येत आहे, या कालांतील टिळकांसंबंधीची एक आठवण गंगाधररावांनी मोठी मार्मिकपणें दिली आहे: हिंदुस्थानला स्वराज्य मिळाल्यानंतर तुम्ही काय करणार, असें टिळकांना एकानें विचारलें असतां त्यांनी असें उत्तर दिलें कीं, "स्वराज्य जरी मिळालें तरी त्याची घडी चांगली बसेपर्यंत मला त्या वेळी प्रचलित असलेल्या सरकारला विरोधच करावा लागणार व त्याबद्दल देखील आपल्याला कारागृहवास भोगावा लागेल" यांतील रहस्य न समजतां आजच्या स्वराज्यांतील सरकारला जो विरोध होत आहे तो त्याच्या विवक्षित कार्याबद्दल नसून विरोधासाठी विरोध आहे असें म्हणावें लागतें. टिळक सुटून आल्यापासून त्यांच्या मृत्यूपर्यंतचीं सहा वर्षें भारतांतील राजकारण तेजाळलें होतें. कॉंग्रेसप्रवेशानंतर तर त्यांचें नेतृत्व अखिलभारतीय झालें, इतकेंच नव्हे तर राजकारणाचें मुख्य तत्व म्हणजे उपक्रमशीलता ती त्यांच्या ठिकाणीं दिसून आली. त्यांच्या या वृत्तीबद्दल गंगाधररावजी म्हणतात, "टिळक अमर नसले तरी 'टिळक तत्त्वें' अबाधित व अमर राहाणार." टिळक तत्व म्हणजे हातीं घेतलेलें काम धैर्यानें व निःस्वार्थ व निरहंकार बुद्धीनें तडीला नेण्याचा प्रयत्न करणें हें होय. या सहा वर्षांत गंगाधररावजी टिळकांचे उजवे हात मानले जात. लखनौ कराराच्या प्रसंगीं जें टिळकांनी केलें व जी दूरदृष्टि दाखविली त्याबद्दल व इतर घटनांना अनुलक्षून गंगाधररावजी म्हणतात, 'टिळकांनी बसविलेली घडी विसकटली गेली. टिळकांचा मुत्सद्दीपणा व दूरदर्शीपणा आमच्यांत नाहीं व गांधीजींची प्रेममूलक समदृष्टीहि नाहीं. त्यामुळें हल्लींचा विचका झाला आहे. या सहा वर्षांच्या काळांत अनेक मतभेदाचे प्रसंग आले, त्याहि बाबतींत आपला कसा मतभेद होता,—टिळकांशी व गांधींशी – ही गोष्ट नम्रपणें, निश्चित रीतीने, त्यांनी सांगितली आहे. ही सत्यप्रीति या 'जीवन कथेचें' एक आकर्षक स्वरूप आहे.

गंगाधररावजींचा एक मोठा गुण दिसून येतो. त्याचे पुरावे या 'जीवनकथे'त अनेक ठिकाणी दिसून येतात—तो म्हणजे जें आपल्याला पटत नसेल तें तसें सांगावयाचें, कोणाच्या हेतूंबद्दल शंका घ्यावयाची नाहीं. पण विपर्यास व थट्टा तर करावयाची नाहींच नाहीं. गांधीजी एक प्रयोग करीत आहेत आणि मानवी जीवन व मानवी राजकारण ही एक प्रयोग-शाला आहे, प्रयोग करीत करीत, चुका करत करत, अनुभव घेत घेत प्रगति होत असते; हा प्रगतीचा सिद्धान्त गंगाधररावांना मान्य होता. कर्नाटकांत त्यांनी आपल्या भोंवताली कार्यकर्त्यांचें एक मंडळ निर्माण केलें होतें. प्रत्येक कार्यात त्यांचें सहकार्य गंगाधररावजींना लाभे. १९१९ साली अमृतसर येथें कॉंग्रेस व्हावयाची होती त्यापूर्वी मॉंटेग्यु रिपोर्ट प्रसिद्ध झाला होता. कॉंग्रेसचें खास अधिवेशन १९१८ च्या सप्टेंबरमध्यें भरलें होतें. पार्लमेंटपुढें बिल आलें होतें त्या सुमारास चिरोलचा खटला टिळकांच्या विरुद्ध झाला व ते हिंदुस्थानाला परत आले होते व जें कांहीं मिळेल तें घेऊन त्याचाच उपयोग करून अधिक चळवळ करावी, असें त्यांचें मत त्यांनी जाहीर केलें होतें. त्याजबरोबर हिंदुस्थानांत आल्यावर आपल्या गैरहजेरींत सत्याग्रहाला सुरुवात केली अशी तक्रार विनोदानें गांधींकडे त्यांनी केली. त्यानी इंग्लंडहून लिहिलेल्या एका पत्रांत मी हिंदुस्थानांत हजर असतों तर गांधीच्या त्या वेळच्या सत्याग्रहाच्या चळवळीत भाग घेतला असता असा उल्लेख आहे. तथापि सत्याग्रह काय अगर कायद्याच्या मर्यादेत राहून केलेलें आंदोलन काय या दोन्ही गोष्टी साधनांच्या आहेत, साध्याच्या नाहीत आणि 'साधनानाम् अनेकता' ही








टिळकांची नीति सर्वज्ञात होती, त्या दृष्टीने जेव्हां १९१९ चा कायदा पास झाला त्याबाबत तो निराशाजनक, अस्वीकार्य व असमाधान करणारा आहे, तथापि तो राबवून पाहिला पाहिजे असें त्यांचें मत होतें. अमृतसरच्या कॉंग्रेसमध्यें दोन पक्ष पडले. शेवटीं तडजोड होऊन जो ठराव पास झाला तो टिळकांच्या मताप्रमाणें झाला. नेमस्त लोकांनीं अमृतसर कॅंग्रेसवर बहिष्कार टाकला होता. तथापि देश सामान्यपणें कॉंग्रेसमागें होता. महाराष्ट्रांत कॉंग्रेस डेमोक्रॅटिक पक्ष टिळकांनी काढला. निवडणुकीची मोहीम निघाली त्यावेळीं गंगाधरराव हे एक उमेदवार होते. निवडणुकींतील त्यांचे अनुभव, विशेषतः जातीयवादासंबंधीचे, मार्गदर्शक आहेत. स्वतः टिळकांनीं उभें राहाण्याचें नाकारलें, तरुण माणसांनी पुढें यावें असें त्यांचें म्हणणें होतें. अमृतसर येथील झालेल्या हत्याकांडाची चौकशी सरकारतर्फे जी केली गेली, त्याबाबत गांधींनी कांहीं मागण्या पुढे ठेवल्या. त्या सरकारने न मानल्यामुळे गांधींनी असहकाराची तुतारी फुंकली, असहकारितेच्या कार्यक्रमांत टिळकांनी भाग घेतला नसता या विचारसरणीला उत्तर देतांना गंगाधरराव म्हणतात, " कॉंग्रेस डेमोक्रेटिक पक्षाच्या घटनेत कॉंग्रेसनिष्ठा हें पहिलें व मुख्य कलम होतें. त्यामुळें कॉंग्रेसचे ठराव टिळकांनी मानले असते, निदान कॉंग्रेस सोडली नसती, कॉंग्रेसमध्यें राहून विरोध केला असता. " खिलाफत चळवळीबाबत गांधी व शौकत अली यांना टिळकांनी असें सांगितलें कीं खिलाफत चळवळींत हिंदी मुसल्मान जी चळवळ हातीं घेतील त्या चळवळींत आपण भाग घेऊं, ते जितके जातील तितके आपण जाऊं. टिळकांनी असहकार सुरू झाल्यानंतर काय केलें असतें याबद्दल गंगाधररावांनी टिळकांच्या बरोबर ज्यांनी २५ वर्षे काम केलें होतें, अशा गृहस्थाचें मत नमूद केलें आहे : " युद्धांत इंग्लंडला जय मिळाला, मुसलमानांची भीति राहिली नाहीं. तुर्कस्थानला संपवून हिंदुस्थानच्या शेजारी असलेल्या मुसलमानी राष्ट्रांना ताब्यांत घेण्याचा डाव इंग्रज खेळत आहेत; यावेळीं मुसलमानी सत्ता टिकली तर हिंदुस्थानचें हित आहे. याप्रसंगीं मुसलमानांना मदत करण्याची कल्पना शहाणपणाची आहे. गांधी हें काम करीतच आहेत. गांधी नव्या जोमानें पुढें येत आहेत. त्यांच्याबरोबर मला काम करावें लागणार but I shall have to play a second fiddle to him and I shall do it, गांधींच्या हाताखालीं देखील टिळकांची काम करण्याची तयारी होती. या गृहस्थांचें जरी गंगाधररावजींनी नांव दिलें नाहीं, तरी ते काकासाहेब खाडीलकर होते हें सहज समजून येण्यासारखें आहे. १९२० च्या ऑगस्ट मध्यें लोकमान्यांचें देहावसान झालें.

लोकमान्यांना अडवणुकीचा मार्ग ( Passive Resistance ) तत्वतः मान्य होता. आंतरराष्ट्रीय राजकारणहि कांहीं तरी ज्वलंत अशा कार्यक्रमाची हाक देत होतें. ४० वर्षे देशामध्य परदास्याविरुद्ध उत्पन्न केलेल्या असंतोषाचे ते जनक होते. पृथ्वीच्या पोटांतील आग जशी ज्वालामुखीवाटे प्रगट होते त्याप्रमाणें जनमनांतील असंतोष त्यांच्या मुखावाटे, त्यांच्या कर्तृत्वावाटे प्रगट होत होता. म्हणून टिळकांनीं गांधींचा पुढे नेणारा कार्यक्रम उचलून धरला असता, तशी त्यांची प्रवृत्ती होती, ऐतिहासिक अनिवार्यतेची दखल घेण्याची दीर्घ दृष्टी व ज्ञान त्यांच्यात होतें. म्हणून गंगाधररावजी जे गांधींचे अनुयायी झाले ते टिळकांचें राजकारणच गांधी चालवित आहत या श्रद्धेने झाले. त्यांचा हा दावा मान्य होण्यासारखा आहे. किंबहुना गांधींच्या कार्यक्रमांतील कांही तपशीलाबाबत मतभेद असणारे २० सालच्या सुमारास राजकारणांत पडलेले अनेक तरुण त्याच मताचे होते.

असहकारितेचा कार्यक्रम अलाहाबाद येथील पुढारी मंडळींच्या भेटींत गांधीजींनी मांडला. कलकत्ता येथील १९२० ऑगस्ट मधील कॉंग्रसच्या खास अधिवेशनांत बहुमताने तो मान्य झाला. त्या अधिवेशनांत लाला लजपतराय अध्यक्ष होते, दीर्घ व प्रसंगीं तीव्र वादविवाद होऊन ठराव संमत झाला होता. त्यावेळी ठरावाविरुद्ध गंगाधररावजींनी मत दिलें होतें, पण त्यांचें मन माझ्या कार्यक्रमासाठी आहे अशी मल्लीनाथी गांधीजींनी एका मित्राजवळ केल्याचें 'जीवन कथेंत' नमूद आहे. गांधीजींचें म्हणणें खरें ठरलें ! कलकत्याच्या ठरावाला मान्यता मिळाली आणि देशभर एक नवीन वातावरण उत्पन्न झालें. खिलाफतीमुळे मुसलमान आकर्षिले गेले. जालीयनवाला बागेंतील कत्तलीमुळें तापलेलें हिंदी लोकमत कांहींना कांहीं तरी विधायक मार्गाकडे न नेल्यास अनपेक्षित असें कांहीं

तरी निर्माण होईल याची जाणीव गांधीजींना होती. राजकारणाचा कायापालट होण्याची वेळ आली होती कांही केलें नसतें तर राजकारण अत्याचाराच्या मार्गानें चालूं लागलें असतें. स्वातंत्र्याचा लढा कोणीकडे भडकला असता हें सांगता येणें कठिण होतें. कलकत्त्याच्या ठरावानें राजकारणाची चाल पूर्णपणें बदलली, राज्य हें लोकांच्या संमतीवर अवलंबून असतें व कायद्यामार्फत तें कार्यान्वित होतें, लोकांनी मानला तर कायदा, न मानला तर तो अप्रभावी ठरतो. जो कायदा लोकांनीं संमत केला नाही तो कायदा वैध नाहीं, म्हणून लोकांवर तो बंधनकारक नाहीं, ही दृष्टि गांधीची होती. कायदा मोडत असलों तरी कायद्याला धरूनच आपण वागत आहोंत ही बुद्धीची कसरत टिळकांच्या राजकारणांतील महावाक्य होतें. गांधीजींची भूमिका नैतिक होती. बौद्धिक नव्हती असें नव्हे; व्यावहारिक नव्हती असेंहि नव्हे; पण जें अवश्य हवें होतें तें म्हणजे मनांतील ऊर्मि शांतपणे बाहेर येऊ देऊन काम करण्याला मोकळीक हवी होती. राज्य हें दंडस्वरूप असतें तथापि केवळ दंडावर तें चालवून भागत नाहीं. आणि जेव्हां कायदेभंग करावयाचा कार्यक्रम गांधीनी स्वीकारला, त्यावेळीं अनेकांना तें अप्रशस्त, अव्यवहार्य, वाटलें. कलकत्त्याच्या अधिवेशनानंतर महाराष्ट्रांत काय प्रतिक्रिया झाली आणि टिळकांच्या अनुयायांमध्यें निश्चयशून्यतेचा अभाव कसा दिसून आला याचा इतिहास या जीवनकथेंत आपल्याला मिळतो. नागपूर येथें १९२० डिसेंबर मधील वार्षिक अधिवेशनांत प्रचंड बहुमतानें असहकारितेचा कार्यक्रम स्वीकारला गेला. कॉंग्रेसची घटना भाषिक तत्वानुसार करण्यांत आली. टिळकांना ज्याप्रमाणें कॉंग्रेस ही एक शक्ति व शस्त्र आहे असें वाटत होतें तशीच दृष्टि गांधींची होती. एका प्रचंड कार्यासाठी त्यांना संघटित अशी कॉंग्रेस हवी होती. ध्येयासाठीं जीव देणारे, देशासाठीं सतत झगडत राहाणारे, कार्यकर्ते त्यांना हवे होते. राजकारण आतां फुरसतीचें राहिलें नव्हतें. तृतीय पुरुषी राहिलें नव्हतें. आतां जं बोललें जाईल तें केलें पाहिजे, नाहीतर पडद्याआड झालें पाहिजे हें उघड झालें. राजकारण म्हणजे सुशिक्षित लोकांचें नेतृत्व ही समजूत नागपूरनंतर नष्ट झाली. टिळकांचें राजकारण तेल्यातांबोळ्याचें असलें तरी मार्गदर्शी नेतृत्व वरच्या वर्गाचें होतें. ती स्थिति बदलली. गांधींनी राजकारण लहान सहान हॉल मधून, वकीलांच्या क्लबांतून, मंडईमध्यें आणलें. चौकाचौकांत तें गरजूं लागलें व यामुळें अनेकांना आपली नेतृत्वाची मिरास गेली असें वाटूं लागलें; भाषावार प्रान्तरचना कॉंग्रेसने केल्यानें राजकारण जनतेच्या भाषेंत अधिक प्रमाणांत होऊं लागलें. असहकारितेच्या कार्यक्रमाचीं कलमें जसजशीं व ज्या प्रमाणांत अमलांत येऊं लागलीं तसतसें त्याच्या क्रान्तिकारी स्वरूपाची ओळख होऊं लागली. जुनें युग संपलें, नवें सुरूं झालें. पुढारीपण व मोठेपण मोजण्याचीं जुनीं वजनें मापें अप्रस्तुत ठरलीं. नवें परिमाण निर्माण झालें. राजकीय जीवनांत विचारांचीं जुनी नाणीं मूल्यहीन झालीं, नवीं नाणीं प्रचलित झालीं. असहकारितेच्या कार्यक्रमांत गंगाधररावजींनी तें तत्व पटून व कॉंग्रेसचें अनुशासन मानून उडी घेतली, व १९२१ च्या ऑगस्ट मध्ये त्यांच्यावर खटला झाला व त्यांना ६ महिन्यांची शिक्षा झाली. स्वातंत्र्यासाठी लढणाऱ्या व्यक्तीला आज ना उद्यां कारागृहवास भोगावा लागणार हें निश्चित होतें. तथापि गांधीयुगाच्या आधीं हें भाग्य थोड्या लोकांना लाभलें होतें. आतां मात्र हें मोठ्या प्रमाणावर लोकांना लाभूं लागलें. एक नवी अस्मिता जनतेंत निर्माण झाली. नवा विश्वास निर्माण झाला. अनेक टीका व संशय यांना बाजूला सारून सुद्धां कार्यक्रम वाट चालूं लागला होता. हा कट होता पण उघड होता. यांत सैन्याची शिस्त होती, पण शस्त्रें नव्हतीं. नेतृत्व होतें पण नेते नव्हते; निदान बडबड करणारे असे नव्हते. ऑगस्ट १९२० पासून १९२२ फेब्रुवारी मध्ये बार्डोलीच्या ठरावापर्यन्त भारतांत जें झालें तें अपूर्व झालें, क्रातिकारक झालें. लौकिक दृष्टीनें यश मिळालें नाहीं हें सत्य असलें तरी युद्धांत ज्या प्रमाणे शेवटची लढाई जिंकली म्हणजे युद्ध जिंकलें असें होतें, तेव्हां शेवटली लढाई आपण जिंकूं असा विश्वास जनतेंत दृढ होवूं लागला. १९२२ साली गांधींना सरकारनें तुरुंगांत टाकलें व त्यांच्या आधी चळवळ थांबवून गांधींनी विधायक कार्यक्रम करण्यास देशाला सांगून जय मिळाला नाहीं तरी पराजयांतील नुकसान कमीत कमी केलें. शिस्तवार माघार घेतली व कॉंग्रेस संघटन कायम ठेवलें!

गंगाधररावजींची सुटका मे १९२२ मध्यें झाली. त्यांच्या सहा महिन्यांच्या गैरहजेरीत हजारो लोक








तुरुंगात गेले होते, बार्डोलीचा सत्याग्रह स्थगित होवून गांधीजींनी राजकारणाला तीव्र स्वरापासून मंद स्वरापर्यंत आणलें होतें. चळवळ जोरांत आहे तोंपर्यन्त ती जोरच धरत जाते व मंद पडूं लागली म्हणजे ती थोड्यांच काळांत थंड होते. येवढ्या मोठ्या प्रमाणावर, थोड्या योजनेने, कमाल विरोध असतांना, सुरूं झालेली ही चळवळ एकंदर तिची प्रगति लक्षांत घेतां जें अपेक्षिलें होतें तेंच झालें, ती थांबवली नसती तर भडकली असती. क्वचित् अहिंसेची मर्यादा ओलांडली गेली होती ती सर्वत्र ओलांडली गेली असती. अनेकांचे गैरसमज झाले. गांधींचें अवतारकार्य संपलें, असें त्या दिवशीं प्रस्तुत लेखकाजवळ शंकरराव लवाटे म्हणाले. त्या वेळी प्रस्तुत लेखकाने त्यांना उत्तर दिलें की आतां खऱ्या अवतारकार्याला सुरुवात होत आहे. काय झालें हें सर्वज्ञात आहे. गंगाधररावजी बाहेर आल्यानंतर मित्रमंडळींशी त्यांनी विचारविनिमय केला व महाराष्ट्रांतील वातावरण पाहून विशेषत: महाराष्ट्रांतील मतभेदाचे परिणाम पाहून, पुढील प्रमाणे उद्‌गार त्यांनी काढले : "महाराष्ट्रांत या मतभेदामुळें कसे तट पडले, त्यांचा परिणाम खाजगी संबंधांवर होऊन माझ्या दृष्टीने महाराष्ट्राचें किती नुकसान झालें, याची चिकित्सा मी करीत नाहीं. रानडे, तेलंग, टिळक, आगरकर, गोखले वगैरे मंडळींच्या कर्तबगारीने जागृतीच्या बाबतींत महाराष्ट्राचा दर्जा इतर प्रांतांच्या मानानें कितीतरी उच्च आहे. तथापि, तीव्र मतभेद व त्याचे दुष्परिणाम यामुळें प्रत्यक्ष महाराष्ट्राची व पर्यायाने राष्ट्राची भयंकर हानि झाली आहे असें मला म्हटल्यावांचून राहवत नाही; " सर्वत्र फेर-नाफेरवाद सुरू झाला आणि लखनौ येथें सुद्धा आलेली पुढारी मंडळी जमली. तेव्हां असहकारितेच्या कार्यक्रमाबाबत चौकशी कमिटी नेमली गेली. ती किती निःपक्षपाती होती व कोणी कशा कशा साक्षी दिल्या याचा मोठा मनोरंजक इतिहास या 'जीवन कथेंत' पाहावयास मिळतो, त्या कमिटीचा रिपोर्ट आल्यानंतर त्याचा विचार गयेच्या काँग्रेसच्या अधिवेशनांत झाला. त्या अधिवेशनांत नाफेरवाल्यांचा जय झाला. तरी शिळया झालेल्या चळवळीची कढी पुन्हा उतास येणार नाहीं, याचा साक्षात्कार सामान्यपणे सर्व कार्यकर्त्यांना झाला होता. कट्टर महंमद अल्लीहि बदललें आणि त्यामुळें असहकारविन्मुख वातावरण उत्पन्न झालें. दिल्लीच्या १९२३ सालच्या काँग्रेसने ठराव करून ज्यांना कौन्सिलप्रवेश करावयाचा होता त्यांना त्याची परवानगी दिली. एक विचित्र परिस्थिति राष्ट्रांत निर्माण केली गेली. बुद्धिभेद चालूच राहिला. कित्येक काँग्रेस कार्यकर्ते किंकर्तव्यमूढ झाले. १९२४ च्या फेब्रुवारींत गांधीजी सुटले व मग त्यांनीच आपल्या व्यावहारिक व विवेकी बुद्धिमत्तेनें परिस्थिति आकलन केली. जें झालें त्याला त्यांनी मान्यता देऊन पवित्र केलें. मतभेदाच्या वातावरणांत असहकारितेची किंवा कायदेभंगाची चळवळ यशस्वी होणें कठीण आहे. याकरितां 'काँग्रेस' मध्यें एकोपा आणण्याकरितां स्वराज्यपक्षाशीं समेट करणें इष्ट आहे असें त्यांचें म्हणणें होतें. "I am stooping to conquer" असें ते म्हणत असत. बऱ्याच मंडळींना त्यांचें हें म्हणणें पटलें. ज्यांना पटलें नाही त्यांचा नाइलाज झाला ! सामान्य काँग्रेस जनांना गांधींनी विधायक कार्यक्रम सांगितला. त्या कार्यक्रमांतच कित्येक वर्षे गंगाधररावांनीं मनोभावें काम केलें. बेळगांव काँग्रेसच्या अधिवेशनाचें श्रेय गंगाधररावांचें आहे. (१९२४). तें इतरांना देण्यांत त्यांचें सौजन्य दिसून येतें; ही 'जीवन कथा' बेळगांव काँग्रेस पर्यन्तच्याच घटनेपर्यंत लिहिलेली आहे आणि म्हणून पुढील राजकारणाचा प्रपंच या 'जीवनकथेंत' नाहीं. स्वातंत्र्य प्राप्तीपर्यंत गंगाधररावजी हे काँग्रेसच्या कार्यांत चंदनाप्रमाणे झिजत राहिले. कार्याचा सुगंध इतरांनी घेतला आणि श्रमाची झीज गंगाधररावांनी उदात्त बुद्धीनें स्वीकारली; हेंच त्यांच्या व्यक्तिमत्वाचें मनोहारी वैशिष्टय आहे.

या ४५० पानांच्या ग्रंथांत केलेली मांडणी कालानुक्रमे आहे. बरेच ठिकाणीं घटनानुक्रमे आहे. सुसंगत असा हा इतिहास ग्रंथ नव्हे पण त्या काळाचा इतिहास लिहिणें झाल्यास ही 'जीवन कथा' अत्यंत उपयोगी पडणार आहे. "हिस्टरी ऑफ आवर टाईम" असें एक सुंदर पुस्तक मॅकार्थी यांनी लिहिलें आहे. तसें देशपांडे यांनी लिहिलें असतें तर चांगलें झालें असतें. तथापि हा ग्रंथ लिहून एक उत्कृष्ट कार्य त्यांनी केलें आहे.



अनुक्रमणिका






डॉ. ग. ना. जोशी

# टागोर-साहित्य, कला, विचार

रवीन्द्र-जन्मशताब्दीच्या निमित्तानें कोल्हापूरच्या कांहीं प्राध्यापक मंडळींनीं रवींद्रनाथांच्या जीवनावर व साहित्यावर कांहीं निबंध लिहून 'टागोर–साहित्य, कला, विचार' या पुस्तक रूपानें प्रसिद्ध केले आहेत. त्याचें संपादन कोल्हापूरच्या कॉमर्स कॉलेजांतील इंग्रजीचे प्राध्यापक श्री. अ. के. भागवत ह्यांनीं केलेलें आहे. प्रकाशन सांगलीच्या डायमंड बुकस्टॉलचे श्री. मा. ना. गाडगीळ यांनीं केलेलें आहे.

पुस्तकाचा हतु स्पष्ट करतांना संपादक म्हणतात– "रवींद्रांच्या प्रतिभेंत केवळ बंगाल्यांचाच नव्हे तर सर्व भारताच्या, किंबहुना सर्व जगाच्या, विचारांना, भावनांना, आणि रसिकतेला स्पर्श करणारा जो भाग आहे तो यथामति अभ्यासून त्याचा आविष्कार करावा ह्या भावनेनें ह्या ग्रंथाची कल्पना स्फुरली."

आचार्य स. ज. भागवतांनीं प्रस्तावनेंत म्हटलें आहे–" रवीन्द्रनाथांची जीवन–साधना आणि त्यांची साहित्य-साधना ही इतकी एकरूप आहे कीं एकीचा अर्थ दुसरीशिवाय उलगडतच नाहीं. रवीन्द्रनाथांच्या साहित्याचा विचार करतांना या गोष्टीचें कधींहि विस्मरण होऊं देतां कामा नये. "रवींद्रनाथांचें साहित्य जितकें भव्य व परिणामकारक आहे त्यापेक्षांहि त्यांचें जीवन भव्य, प्रभावी व आदरणीय होतें. रवींद्रनाथांचें जें जीवन लोकांना माहीत आहे तें कदाचित् फारच तोटकें असावें. त्यांच्या जीवनाचा सखोल परिचय जगाला नसावा. त्यामुळें त्यांना समजणें हें दिसतें तितकें सोपें नाहीं."

## जीवनवृत्तान्त

श्री. प्रल्हाद वडेर यांनीं आपल्या सुरवातीच्या 'जीवनवृत्तान्त' या लेखांत मैत्रेयी देवी यांच्या Tagore by fireside या पुस्तकांतील रवींद्रनाथांचा पुढील उतारा उद्धृत केलेला आहे. रवींद्रनाथ स्वतःविषयीं म्हणतात- "लोक माझें चरित्र लिहिण्याचा प्रयत्न करतात, तेव्हां मला काय वाटतें हें सांगतां येणार नाहीं. माझ्या जीवनाची कोणाला माहिती आहे ? मी माझें दीर्घ आयुष्य कसें घालविलें, माझे विचार, माझ्या भावना कोणत्या होत्या, माझीं सुखदुःखें कोणतीं, माझे अनुभव कोणते आणि किती वेगवेगळ्या दिशांना मीं माझा अस्थिर प्रवास केला हें कोण सांगूं शकेल ! कोणीं माझ्या आयुष्याचा कांहीं थोडा भाग पाहिला आहे, कोणी जास्त; पण कोणालाच न दिसलेला केवढातरी भाग माझ्या आयुष्यांत आहे.... रवींद्रनाथ ह्या माणसाची माहिती किती लोकांना आहे ? तुम्हांला त्याचा किती थोडा भाग दिसला आहे !" रवींद्रनाथांवर त्यांच्या बालपणांत जे विविध संस्कार झाले, त्यांनीं ज्या विविध भावना अनुभवल्या, ते ज्या सुखदुःखांच्या नाजूक प्रसंगांतून गेले, त्यांनीं जे मानापमान अनुभवले, ज्या विरहाच्या व्याकुळतेंतून ते गेले, त्या सर्व प्रसंगांचें वर्णन श्री. वडेर यांनीं नाजूकपणानें केलेलें आहे.

## रवींद्रांचें तत्त्वज्ञान

दुसरा लेख श्री. गं. वि. कुलकर्णी यांनीं रवींद्रनाथांच्या 'तत्त्वज्ञानावर' लिहिलेला आहे. ते म्हणतात– "रवींद्रनाथांच्या काव्याचा आस्वाद घेत असतांना, इतर ललित लेखनाचा आस्वाद घेत असतांना त्यांच्यांतल्या तत्त्वज्ञाला आपणांला वगळतां येणार नाहीं. किंबहुना एक पाऊल पुढें जाऊन आपण असेंहि म्हणूं कीं, त्यांचें काव्य आणि तत्त्वज्ञान अलग मुळींच नाहींत. पानांतला हिरवेपणा आणि रसरशीतपणा जसे एकजीव असतात, तसेंच त्यांचें काव्य आणि तत्त्वज्ञान एकसंध, एकजीव. 'तत्त्वज्ञ कवि' अशीहि प्रतिभावंतांची जात असते. रवीन्द्र हे त्यांपैकींच होत. रवीन्द्रांच्या वाङ्मयांत त्यांच्या साक्षात्कारवादी मनाची साक्ष दिसल्यावाचून राहात नाहीं.

श्री. कुलकर्णी म्हणतात– "रवीन्द्रनाथांच्या मतें जीवनाचें मूलतत्त्व 'आनंद' हें आहे व तें सर्वत्र विश्वांत विविधरूपांनीं विखुरलेलें आहे. शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध यांच्याद्वारां इन्द्रियांनीं घेतलेल



अनुक्रमणिका

विषयांचा आस्वाद हें त्याचेंच स्वरूप. एकाच तत्त्वानें भोगासाठीं जणुं स्वतःला अनेक करून घेतलें आहे. जन्म-मृत्यु, सुख-दुःख, शीत-उष्ण, मान-अपमान, जय-पराजय, इत्यादि द्वंद्वांतून हें आनंद-तत्त्वच साकारत आहे. कुठलेंच रूप त्याला वर्ज्य नाहीं. द्वंद्वें काय अगर द्वंद्वांतीत तत्त्व काय, सारें एकच आहे." 'आनन्दरूपमृतं यद्विभाति'हें उपनिषदांतील वचन रवीन्द्रांचें अत्यंत आवडतें आहे व तें शांतिनिकेतनाच्या प्रवेशद्वारावर कोरलेलें आहे. रवींद्रांच्या मतें सळसळणारें, रसरसणारें, जीवन-चैतन्य हेंच सत्य आहे; तेंच सौंदर्य आहे, तोच प्रभु आहे. हें सारं विश्व-हा अवघा संसार, ही त्याचीच लीला आहे, हा त्याचाच विलास आहे.-त्याला विलासावाचून चैन पडत नाहीं. आविष्कारावाचून तें स्वस्थ राहूं शकत नाहीं." 'तेन त्यक्तेन भुञ्जीथा' हें तत्त्वज्ञान रवींद्रांना खरें वाटतें.

## रवीन्द्रांचें काव्य

श्री. द. स. शिरोडकर रवीन्द्रनाथांच्या समग्र काव्याचा थोडक्यांत आढावा घेतांना म्हणतात — "सहजता हा त्यांच्या काव्याचा पहिला विशेष आहे. झाडांना पानें फुलें यावींत अशा नैसर्गिकपणें ते कविता लिहितात. भाषेवरील असामान्य प्रभुत्व, शब्दांच्या निवडींतील चोखंदळपणा, शब्दांतील संगीतानें वेडावलेलें मन, छंदांशीं प्रयोग करण्याची वृत्ति, यांमुळें त्यांच्या साऱ्याच कविता 'वाचनीय' होतात." शिरोडकर म्हणतात कीं, रवीन्द्रांच्या काव्यावर वेदोपनिषदें, सूफी गूढवाद व संतकाव्य यांचा परिणाम झालेला आहे. तसाच वर्ड्स्वर्थ, शेले, कीट्स् यांचाहि परिणाम झालेला आहे; तरीहि त्यांच्या सर्वोत्कृष्ट कवितांत उसनवाट मात्र कोठेंहि भासत नाहीं. त्यांच्या प्रेमगीतांत तीव्र विह्वलता आढळते. स्त्रीचीं प्रेयसी, गृहिणी, माता अशीं विविध रूपें त्यांनीं आपल्या काव्यांत रंगविलीं आहेत. क्वचित् त्यांच्या गीतांमधून भावनांचा उद्दामपणा आढळत असला तरी एकंदरींत पाहूं जातां ते आपल्या भावना संयमानें व सूचकतेनें व्यक्त करतात. त्यांचें प्रेम व तें व्यक्त करण्याची रीत ही वेगळी आहे. मौनांतून, इशाऱ्यांतून, नेत्रसंकेतांतून तें व्यक्त करावें अशी त्यांची वृत्ति. रवीन्द्रनाथांची शैली संयमाची, हळुवारतेची, नाजुकतेची व सुसंवादित्वाच्या मर्यादा न सोडण्याची अशी होती. म्हणून कदाचित् त्यांच्या काव्यांत, नाटकांत व इतर साहित्यांत प्रस्फोटकता, बेभानता व उद्दामता दिसून येत नसेल. रवींद्रनाथांची वृत्ति ही संगीतप्रधान असल्यानें व संगीताला सुसंवादितत्वाच्या मर्यादा पाळाव्या लागत असल्यानें त्यांची अनुभूति उत्कट असूनहि ती त्यांच्या काव्यांत उद्दामपणें प्रकट होऊं शकली नसावी. रवीन्द्रांच्या गूढगुंजनाचा अकारण बाऊ करण्यांत आला आहे. ज्या अर्थानें योगी अरविंद गूढ कवि आहेत त्या अर्थानें रवींद्र गूढकवि म्हणतां येत नाहींत. रवींद्रांच्या काव्यांत अकारण हुरहूर आहे, उदासीनता, विषाद हे भाव निःसंशय आढळतात. रवींद्रांचें साहित्य प्रेरणादायी व कार्यास उद्युक्त करणारें नाहीं, तें निवृत्तिपर व अळणी आहे; त्यांत जोम नाहीं, शक्ति नाहीं; तें विकल व हळवें आहे, असें म्हटलें जातें. पण लेखकाच्या मतें हा आक्षेप व्यर्थ आहे. कारण रवींद्रांनीं देशभक्तीच्या प्रभावी व प्रेरक अशा बऱ्याच कविता लिहिल्या आहेत. रवींद्रनाथांचें काव्य कुठल्याहि सांच्यांत बसवितां येणार नाहीं. कारण त्यावर रवींद्रांचाच ठसा खोलवर उमटला आहे. तें विशाल आहे, धरतीसारखें समृद्ध आहे, विविधरंगी आहे, सर्वस्पर्शी आहे, थोडक्यांत तें सागरासारखें आहे... !

## रवींद्रांच्या कथा

श्री. वि. स. खांडेकर यांनीं रवींद्रनाथांच्या कथांचें रसग्रहण केलेलें आहे. त्यांच्यामतें रवींद्रनाथांच्या कथा कलात्मक व हृदयंगम आहेत. रवींद्रांच्या कथा दीर्घकथा, भावकथा व प्रश्नकथा अशा तीन प्रकारच्या आहेत. खांडेकर म्हणतात कीं रवींद्रांच्या कथांत नाट्य, कल्पकता, काव्यात्मकता, रंजकता व भावप्रवणता आहे. त्यांनी रवींद्रांच्या नष्टनीड, काबुलीवाला, पोस्टमास्तर, अतिथि इत्यादि कथांचें तपशीलवार विश्लेषण केलेलें आहे. श्री. खांडेकर म्हणतात— "पात्रें, प्रसंग, शैली, वातावरण, परिणाम यांच्या एकात्म संगमांतून निर्माण होणारी नवी लघुकथा रवींद्रांनीं प्रथम निर्माण केली. बंगाली लघुकथेचे खरेखुरे जनक व संवर्धक रवींद्रनाथच होत. – रवींद्रांनीं लघुकथांची जी नवी सृष्टि निर्माण केली तिचीं मुळें परदेशांत नाहींत. त्यांनीं लघु-

लेखनाला प्रारंभ करण्यापूर्वी नुकताच होऊन गेलेला मोपासाँ किंवा ज्या दशकांत त्यांनीं उत्कृष्ट कथालेखन केलें त्या दशकांत आपलें जगन्मान्यता मिळविणारें कथा-लेखन करणारा चेकॉव्ह या दोघांच्या किती कथा त्यांच्या वाचनांत आल्या होत्या हें सांगणें कठीण आहे. पण एक गोष्ट निश्चित आहे. त्या दोघांच्याहि कथेचा त्यांच्या लघुकथेवर कोणताहि परिणाम झालेला नाहीं. रवींद्रांची लघुकथा अगदीं स्वतंत्र आहे. अन्तर्बाह्य भारतीय आहे. त्यांच्या भावनाप्रधान अंतरंगांतून स्फुरलेली, नकळत काव्याच्या अगदीं जवळ गेलेली, कुठलींहि सुखदुःखें चित्रित करतांना आपल्या मातीला व आकाशाला न विसरणारी, विषयाच्या निवडीपासून भाषाशैलीपर्यंत अस्सल स्वदेशी असलेली ही लघुकथा हें रवींद्रवाङ्मयाचेंच नव्हे तर भारतीय साहित्याचेंहि एक भूषण आहे." रवींद्रांनीं हाताळलेलें तंत्र व शैली वेगळी आहे; त्यामुळें त्यांच्या कथांना गौणत्व येण्याचें कारण नाहीं. जुनी कथा बहिर्मुख होती; वर्णनांत, परंपरागत संकेतांत, चमत्कृतिजनक घटनांत आणि त्यांना शोधणाऱ्या विस्तारांत ती रमून जाणें स्वाभाविक होतें. पण रवींद्रनाथांची लघुकथा ही जुन्या चाकोरींतून बाहेर पडली आहे. तिनें पो, गोगोल, मोपासाँ, चेकॉव्ह, वगैरे पाश्चात्य लघुकथाकारांच्या पावलांवर पाऊल ठेवून मार्गक्रमण केलेलें नाहीं हें खरें! पण तिनें आपली सुंदर पाऊलवाट स्वतः शोधून काढली आहे."

## रवींद्रांच्या कादंबऱ्या

संपादक प्रा. भागवत यांनीं रवींद्रनाथांच्या कादंबऱ्यांचा धांवता आढावा घेतला आहे. तो परिचयात्मक रसग्रहणाचा आहे. त्यांनीं रवींद्रनाथांच्या कादंबरीचें कलाकृति म्हणून तिचें वैशिष्ट्य, तिनें विषय व त्याचा आविष्कार यांचा सांधलेला समतोल, त्यापासून रचलेला एक आकृतिबंध कितपत हृद्य व कलात्मक आहे; त्यांत आंतरिक संगति किती प्रमाणांत आहे, त्यांतील व्यक्तिरेखाटन कितपत जिवंत व प्रत्ययकारी आहे, त्यांतील जीवनाशय किती सखोल व मर्मग्राही आहे इत्यादि कसोट्या लावून मोजमापन करण्याचा प्रयत्न केलेला आहे. केवळ विकारांवर व भावनांवर खेळणारीं व नाचणारीं स्त्रीपुरुषांचीं जीवनें कलाकृतींत चितारणें एवढेंच कलेचें कार्य आहे असें रवींद्रनाथांना वाटत नाहीं, तर या जीवनाच्या बुडाशीं व शेवटीं जी अगाध शांति व असीम आनंद भरून राहिला आहे तोच सत्य आहे. ती शांति व तो आनंद हेंच जीवनाचें अंतिम मूल्य, अंतिम गन्तव्य व प्राप्तव्य आहे व कलाकृतीनें त्याचें अंगुलिदर्शन करावें असें रवीन्द्रनाथांचें मत दिसतें. दिशाहीन, उद्दिष्टहीन विकारांचीं वादळें व आंदोलनें व त्यांच्यावर हिंदुळणारीं दिशाहीन व ध्येयहीन अगतिक जीवनें चितारणें हें कलादृष्ट्या इष्ट ठरणार नाहीं असें रवींद्रांचें मत होतें, असें दिसतें. प्रा. भागवत म्हणतात– " रवींद्रांच्या तेरा कादंबऱ्या वाचून लेखकाच्या व्यापक सहानुभूतीचें, व्यक्तींबद्दल त्यांच्या थोर अपेक्षांचें, व्यक्तींतील ऋजुता, सत्यनिष्ठा, जोपासण्याच्या तळमळीचें, प्रत्यंतर येतें. अबला जीवनाकडे, स्त्रीच्या असहायतेकडे त्याचें लक्ष केंद्रित झालेलें दिसतें, पण तिच्या दुःखाचें आणि व्यथेचें करुण दर्शन करून तो थांबत नाहीं. अतिप्रबळ प्रेमभावनेचें तिच्यावरील वर्चस्व दाखवितांना तो रूढ नीतिनियमांची पर्वा करीत नाहीं. पतिनिष्ठा, कौटुंबिक प्रेम, अपत्यस्नेह, सांसारिक कर्तव्यें ह्यांच्याहि पलीकडचें व्यक्तिस्वातंत्र्य हें मूल्य त्या स्त्रीरेखा मानतात असें दिसतें. ह्याबरोबरच हिंदुस्थानांतील नवजीवनाच्या चळवळींतून उद्भूत झालेलें विचारभावनांचें सारच जणुं आपल्या व्यक्तिरेखांत त्यानें सजीव केल्यासारखें वाटतें. ह्या कलात्मकचित्रणाला एक अखिल भारतीय बाजू आहे व त्याबरोबर जागतिकसुद्धां."

## रवींद्रांचीं नाटकें

प्रा. गो. के. भट यांनी रवीन्द्रनाथांच्या 'नाट्यावर' निबंध लिहिलेला आहे. त्यांच्या मतें रवीन्द्रनाथ आपल्या सर्जनशक्तीचें व अभिव्यक्तीचें सामर्थ्य अजमावण्यासाठीं नाटकाकडे वळले असावेत. रवींद्रांनीं तिसाच्यावर नाटकें रचिलीं. त्यांत गद्य–नाटकें, पद्यरचनेनें सजवलेले नाट्यसंवाद, नाटिका, प्रहसन, गीतिनाट्य, काव्य–नाट्य, असे विविध रचनाप्रकार आहेत. प्रा. भट म्हणतात कीं रवींद्रांचीं बहुतेक नाटकें काव्यप्रकृतीनें अंकुरलीं आहेत किंवा स्फुरलीं आहेत. रवींद्रांचीं नाटकें हीं तत्त्वप्रधान आहेत. त्यांच्या नाट्यसाहित्यांत ज्याला ढोबळ अर्थानें सामाजिक म्हणतां येईल असें नाट्य घेतलें तरी त्यांत मानवी जीवनाचा










एखादा समृद्ध अनुभव चित्रित करून, त्यांतून घन आशयाचें तत्त्व सुचविण्यापेक्षां, एखाद्या खोल तत्त्वाचा आविष्कार करण्यासाठींच अनुभवाची मांडणी त्याच्या-भोंवतीं करण्यांत आली आहे, असा वारंवार भास होतो. स्त्री-पुरुषांतील अशरीर विशुद्ध अंश प्रकट करण्याचा त्यांनीं अनेक वेळां प्रयत्न केलेला आहे. त्यांच्या सर्व नाटकांत अनेक फाटे फुटलेलें कथानक आहे. पण त्यांच्या विकासाचे धागे मूळ एखाद्या तत्त्व-कोशाभोंवतीं गुंफलेले आहेत असें वाटल्यावाचून राहात नाहीं. कोशांतून अंकुर आणि पाकळ्या– कांहीं वेळां विविधरंगी– फुटाव्यात त्याप्रमाणें हीं नाटकें फुललेलीं आहेत. जीवनांतील जीं कांहीं. भव्य तत्त्वें लेखकाला दिसलीं आहेत त्यांचा आविष्कार करण्यासाठीं त्यानें नाट्याची खुलावट केली आहे. रवींद्रनाथांचीं नाटकें, नाटकें या नात्यानें, लोकांना सहज समजण्यासारखीं नाहींत. त्यामुळें तीं सामान्यमाणसाच्या मनाची पकड घेऊन त्याचें अंतःकरण हलवून सोडूं शकत नाहींत, असा अनुभव येतो. तीं रूपकात्मक असल्यानें व चिंतनात्मक स्वरूपाचीं असल्यानें त्यांचा रंगमंचकावरून प्रेक्षकांच्या मनावर पाहिजे तसा प्रत्यक्ष परिणाम होत नाहीं. कदाचित् ह्याचें कारण त्यांच्या शैलींतील काव्यप्रचुरता हेंहि असूं शकेल. लेखाचा शेवट करतांना प्रा. भट म्हणतात – " टागोरांचें नाट्य हें आषाढ घनाप्रमाणें वाटतें. त्याच्या पोटांत ठासून भरलेला आशय हा काव्याचा आहे. वप्रक्रीडा करण्यासाठीं वांकलेल्या गजाप्रमाणें या घनानें नाट्याची क्रीडा केली तरी त्याचा आशय एकदां पाझरायला लागला कीं काव्याची बरसात सुरू होणार हें अपेक्षितच आहे. त्याच्या वप्रक्रीडेची प्रेक्षणियता मन वेधून घेणारी असली तरी जीव निवतो तो आशयाच्या अमतधारांनींच. "

## रवींद्र व मराठी

प्रा. द. भि. कुलकर्णी यांनीं ' रवींद्र व मराठी ' या आपल्या लेखांत रवींद्रनाथ व मराठी साहित्य यांचा परामर्श घेतला असून रवींद्र-साहित्य मराठींत कां लोकप्रिय होऊं शकलें नाहीं ह्या प्रश्नाची मीमांसा केली आहे. ते म्हणतात – " रवींद्रांचें गुणवर्णन करतांना आपण त्यांचें मूल्यमापन करावयाचें विसरलों. म्हणूनच अभ्यासकाच्या मनांत टागोरविषयक नानाप्रश्न डांचत राहतात. " श्री. कुलकर्णी यांना त्यांच्या या लेखांत काय म्हणायचें आहे तें स्पष्ट झालेलें दिसत नाहीं. रवींद्रनाथांच्या विभूतिमत्त्वानें दिपून जाऊन महाराष्ट्रीय वाचकांनीं त्यांच्या साहित्याचें यथार्थस्वरूप समजून घेतलेलें नाहीं कीं रवींद्रनाथ हे उच्चदर्जाचे कलावंत साहित्यिक नाहींत असें त्यांना म्हणावयाचें आहे हें नीट समजत नाहीं. त्यांची खरी तक्रार दिसते ती रवींद्रांचें साहित्य मराठींत अनुवाद करणाऱ्यांविरुद्ध. त्यांच्यामतें रवींद्रांचे जे मराठी अनुवादक आहेत त्यांनीं रवींद्रांच्या साहित्यांतून नीट निवड करून त्यांची खरी कलात्मक सौंदर्यनिर्मिति मराठींत आणलेली नाहीं. श्री. कुलकर्णी म्हणतात — " अनुवादाला पेलूं नये असें रवींद्रांचे काव्य आहे, अनुवादाचें अगत्य वाटूं नये असें त्यांचें पुष्कळसें गद्य आहे. रवींद्रसाहित्याच्या प्रचारकांची कोती वृत्ति हें आणखी एक कारण. लेखकाचा गांधीवाद्यांवर फारसा रोष दिसतो. गांधीवादी मंडळींनीं रवींद्रांच्या विचारांतील जीवनाभिमुखी विचारांचा व दास्यांत रुतलेल्या भारतीयांच्या मनांत आत्मतेज जागृत करून त्यांना पुरुषार्थी बनविणाऱ्या विचारांचा अधिक हिरीरीनें प्रचार केला हें जरी खरें मानलें तरी त्यांनीं रवींद्रनाथ हे कलावंत नव्हते किंवा त्यांचें साहित्य कलापूर्ण नाहीं असें कधींहि म्हटलें नव्हतें. उलट रवीन्द्रनाथांचें व्यक्तिमत्त्व व विचार फार भव्यदिव्य आहेत व त्यांचें साहित्य फार उच्च श्रेणीचें आहे असेंच त्यांनीं सर्वत्र सांगितलें आहे. गांधीवाद्यांव्यतिरिक्त जे कलाप्रेमी रसिक साहित्यिक महाराष्ट्रांत होते त्यांनीं रवींद्रनाथांच्या साहित्यांतील निखालस कलापूर्ण अशा भागांचा मराठी वाचकांना परिचय करून दिला असता तर मला वाटतें त्यामुळें गांधीवाद्यांना आनंदच वाटला असता. परंतु दुर्दैव असें कीं महाराष्ट्रांतील साहित्यिकांनीं हें काम केलें नाहीं. ते रवींद्रांविषयीं उदासीन कां राहिले असावेत हें एक कोडेंच आहे. खरें म्हणजे कलेचें हार्द जाणणाऱ्या रसिक कलाभिज्ञांनीं रवींद्रनाथांच्या साहित्यांतील कलापूर्ण सौंदर्यस्थळें मराठीवाचकांपुढें आणायला पाहिजे होतीं. हें कार्य करण्यास गांधीवादी लोक योग्य नव्हते; हें कार्य त्यांनीं केलें नाहीं कारण तें त्यांचें कार्य नव्हतें असें म्हटल्यास तें गैरवाजवी होणार नाहीं. "



अनुक्रमणिका







## रवींद्रांचा कलाविषयक दृष्टिकोन

प्रा. ल. म. भिंगारे यांनीं 'कला-विषयक दृष्टिकोन' या आपल्या लेखांत रवीन्द्रनाथांची कलानिर्मितीची भूमिका तपासून मांडली आहे. त्यांच्या मतें रवीन्द्र-नाथांच्या निर्मितीची बैठक ही केवळ कला-निर्मात्याची नाहीं. कलानिर्मात्यापेक्षांहि तत्त्वज्ञान्याची प्रकृति ही त्यांच्या बाबतींत अधिक प्रभावी आहे. ते म्हणतात कीं, नैसर्गिक कलानिर्मितीचा पाया कलावंताचें व्यक्तिमत्त्व हा असतो. कलेंत कलावंताचा आत्मा व्यक्त होत असतो. रवींद्राचा कलावाद हा जीवनापासून दूर जाणारा पलायनवाद नव्हे. रवींद्र केवळ कलावादी नव्हते. त्यांच्या कलाकृतींत बोधालाहि स्थान आहे. टागोरांच्या व्यक्तिमत्त्वाला कवि टागोर व टीकाकार टागोर असे दोन पैलू आहेत असें भिंगारे यांचें मत आहे. समारोप करतांना श्री. भिंगारे म्हणतात "कथा-कादंबऱ्यांत विशेषतः कादंबऱ्यांत' टागोरांनीं बहुतेक सर्व वेळां रूढ आणि लौकिक अर्थानें 'समस्या प्रधान' Thematic रचना केली आहे तर रूढ संदर्भांत त्यांचें काव्य मात्र बोधात्मक हेतुवादापासून अलिप्त आहे. यावरून असें अनुमान काढतां येईल कीं लौकिक जीवनांतील ब्राह्मो समाजाशीं किंवा बंगाली सुधारणावादाशीं निगडित असलेलें व्यक्तिमत्व हें कादंबरी रचित होतें; तर प्राचीन काळांत वावरणारा, अलौकिकाचा ध्यास घेणारा, अरण्यवासी ऋषि 'काव्यां'च्या अलौकिक दालनांत वावरत होता. तेंच त्याचें खरें विश्रांति-स्थल होतें."

## रवींद्रांची चित्रकला

रवीन्द्रनाथांच्या चित्रकलेवर थोडक्यांत पण सुबोध रीतीनें रवींद्रनाथांची चित्रकलेंतील दृष्टि व वैशिष्ट्यें स्पष्ट करून त्यांच्या चित्रांचें स्पष्टीकरण करून रस-ग्रहणात्मक मार्गदर्शक असा लेख श्री. बाबूराव सडवेल-कर यांनीं लिहिल्याबद्दल त्यांचें अभिनंदनच करावयास पाहिजे. ते म्हणतात— "त्यांच्या कलेस कोणतीहि विशिष्ट विचारपरंपरा किंवा टीकापद्धति नीटशी लागू पडत नाहीं. कोणत्याहि विशिष्ट तत्त्वप्रणालीचें जूं त्यांच्या चित्रांच्या मानेवर पेलत नाहीं. कोणत्याहि प्रकारच्या एकांगी अशा प्रखर टीकेच्या प्रकाशांत त्यांच्या चित्रांचें सौंदर्य पार कोमेजून जातें. नाजुकता त्यांच्या चित्रांच्या प्रकृतींतहि प्रामुख्यानें दिसून येते. तंत्राविषयीं अनभिज्ञ पण जातिवंत हळव्या हृदयाच्या टागोरांनीं चित्रित केलेल्या कलाकृतींतील हळुवारपणें वापरलेल्या रंगीत शाईचा तजेलाहि दिवसाच्या सताड प्रकाशांत मंदावून जाईल, असें तज्ज्ञांचें मत आहे. ...... कविवर्य टागोरांची प्रकृतिच अशी स्वच्छंदी, निरागस आणि हळवी होती आणि म्हणूनच कीं काय याच वृत्तींचा भास त्यांच्या चित्रांतहि क्षणोक्षणीं येतो. त्यांच्या चित्रांत कोणताहि विशिष्ट आविर्भाव नाहीं, कोणत्या तंत्राचा बडेजाव नाहीं किंवा त्यामागें कोणतेंहि विशिष्ट तत्त्वज्ञान नाहीं. जणुं एखाद्या बालकानें स्वतःच्या वेड्यावाकड्या बोलामध्यें जमवलेलं स्वतःशींच गाइलेलं आणि स्वतःच एकतान होऊन ऐकलेलं एक लहानस गीतच."

श्री. सडवेलकर रवींद्रांच्या कल्पनाचित्रांच्या बाबतींत म्हणतात— "टागोरांचीं कल्पनाचित्रें मात्र कांहींशीं अबोल आहेत. ... त्यांच्यांत कधीं लय आणि गतीचा भास होतो तर कधीं त्यांच्यांतला काष्ठवत् ओबडधोबड-पणाहि नजरेस भिडतो. इतकें असलें तरी त्यांच्यामधून दिसणाऱ्या पात्रांना कांहींतरी सांगायचें आहे असें भासतें. पण तीं कधींहि कांहीं सांगत नाहींत. जणु हीं पात्रें आपला संवादच विसरून गेल्यामुळें बावरून लज्जेनें स्तब्ध झालीं आहेत. हीं पात्रें म्हणजे कवि टागोरांना शब्दांनीं न उलगडणारी कोडीं असावींत. पण आकारांनींहि तीं आपली ओळख कुणाला नीटशी पटूं देत नाहींत इतकीं तीं गूढ आहेत."

## राष्ट्र आणि संस्कृति

कोल्हापूरच्या व्यापार-महाविद्यालयाचे प्राचार्य भा. शं. भणगे यांनीं 'राष्ट्र आणि संस्कृति' शीर्षकानें एक महत्त्वपूर्ण लेख लिहिला आहे. आपल्या या लेखांत सुरवातीस त्यांनीं रवींद्रनाथांच्या राष्ट्राविषयींच्या कल्पना त्यांच्याच शब्दांत मांडल्या आहेत. त्यांनीं समाजांत एकात्मता नसतांना राजकीय स्वातंत्र्य मिळविणें धोक्याचें आहे हें टागोरांचें अत्यंत मौल्यवान् मत यांत मांडलें आहे. जातिसंस्था व परावलंबित्व आणणारें रुढिप्रामाण्य नाहींसें करून स्वावलंबी खेडीं व समाज तयार झाल्याशिवाय राजकीय स्वातंत्र्य टिकणार नाहीं हें टागोरांचें अत्यंत मौलिक मत यांत मांडलें आहे. रवींद्रनाथांचा संकुचित राष्ट्रवादास तीव्र विरोध होता.

प्रा. भणगे यांनीं गांधीजी व रवींद्रनाथ यांच्या दृष्टिकोनांतील भेद मांडला आहे. गांधीजींची असहकाराची कल्पना व मोहीम ही नकारात्मक असल्याने तिच्यामुळें पूर्व व पश्चिम यांच्यांत विग्रह वाढेल अशी भीति रवींद्रनाथांना वाटत होती व म्हणून त्यांनीं तिला विरोध केला होता. चरखा हा संपूर्ण व व्यापक समाजक्रांतीचें प्रतीक व साधन होऊं शकत नाहीं या मुद्यावर त्यांनीं गांधीजींच्या चरख्यावर टीका केली होती. उलट रवींद्रनाथांनीं सुचविलेला मार्ग विधायक होता व तो म्हणजे खेडीं स्वयंपूर्ण व स्वावलंबी करण्याचा. टागोरांनीं गांधीजींच्या नेतृत्वाखालीं बेफामपणें वाढणाऱ्या राष्ट्रवादावर टीका करून सावधगिरीची सूचना दिली होती. त्यांच्या उदारमतवादानें गांधीजींच्या नेतृत्वाखालीं बेफाम होऊं पाहणाऱ्या राष्ट्रवादाला लगाम घालण्याचा इष्ट प्रयत्न केला होता व त्यांचें हें काम आगरकरांच्या कामासारखें होतें असें प्रा. भणगे यांचें मत आहे. ते या लेखाच्या शेवटीं म्हणतातः– "स्वातंत्र्य मिळेपर्यंत टिळक-गांधी यांचा विजय झाला. स्वातंत्र्य मिळाल्यावर त्यांच्या चळवळीचें दौर्बल्य अनुभवास येतें-अशा अर्थानें कीं सामाजिक विषमता आणि अन्याय स्वातंत्र्याच्या यक्षिणीच्या कांडीनें दूर होत नाहीत हें कळतें. विषमता आणि अन्याय दूर करण्यासाठीं जी मनाची शिकवण आणि शिस्त लागते ती राजकीय चळवळींत तयार होत नाहीं. गांधींचें अपयश नेमकें येथें जाणवतें."

## रवींद्रांची शिक्षणपद्धति

शेवटचा लेख श्री. मीरा भागवत यांनीं रवींद्रनाथांच्या 'शिक्षण' पद्धतीवर लिहिला आहे. मीराबाईंनीं रवींद्रनाथांच्या स्वतंत्र अशा गुरुकुलपद्धतीच्या शिक्षणसंस्थेचें व शिक्षणपद्धतीचें वर्णन रवींद्रनाथांचे स्वतःचे उतारे उद्धृत करूनच केलेलें आहे. शिक्षणसंस्थांना कारखान्यांचें स्वरूप येऊं देतां कामा नये; मुलांचा विकास निसर्गाच्या सान्निध्यांत मुक्तपणें व स्वच्छंदानें व्हावयास पाहिजे. प्रकृतिमातेच्या अंगाखांद्यावर खेळतां खेळतां झाडांच्या, फुलांच्या व वेलींच्या सान्निध्यांत, हिरवळीच्या चादरीवर, मंदमंद वाऱ्याच्या लहरींवर व लुकलुकणाऱ्या तारकांच्या स्निग्ध प्रकाशांत, चंद्राच्या धवल चंद्रिकेंत, अनंत गगनाच्या विशाल सभामंडपांत बालकांच्या मूलप्रवृत्तींचा फुलोरा फुलेल अशा रीतीनें त्यांचीं मनें प्रसन्न ठेवून फुलवीत राहणें व हळुहळू सहजपणें त्यांचा विकास करणें हें शिक्षणाचें ध्येय असलें पाहिजे असें रवींद्रनाथांच मत यांत मांडलें आहे. विद्यार्थ्यांच्या मनावर माहितीचे नुसते भारे न रचतां ज्ञान त्यांना आत्मसात् करतां आलें पाहिजे. संगीत व इतर ललितकलांचा सर्जक आनंद विद्यार्थ्यांस स्वतः घेतां आला पाहिजे. शिक्षणांत पौर्वात्य व पाश्चिमात्य, प्राचीन व अर्वाचीन यांचा मनोहर संगम व समन्वय साधून शिक्षणानें व्यक्तीचा आध्यात्मिक विकास करीत तिला परिपूर्णतेस नेलें पाहिजे. अशी शिक्षणव्यवस्था रवींद्रनाथांनीं शांतिनिकेतन व तेथें विश्वभारती स्थापन करून साकार करण्याचा महान् प्रयत्न केला.

हें पुस्तक २२९ पानांचें लहानसें असलें तरी रवींद्रनाथांच्या जीवनाच्या बहुतेक सर्व अंगांना स्पर्श करणारें व त्यांच्या साहित्याच्या व कलेच्या विविध दालनांचा परिचय घडवून देणारें असें पुस्तक मराठींत एकमेव असल्यानें मराठी वाचकांस ह्याचा नक्कीच फार उपयोग होऊं शकेल. या पुस्तकाच्या साहाय्यानें रवींद्रनाथ एक महापुरुष, द्रष्टे, प्रतिभासंपन्न कवि व कलावंत, कादंबरीकार, कथाकार, नाटककार, शिक्षणतज्ज्ञ, तत्त्वज्ञानी, संगीतकार व अध्यात्मप्रवण ऋषि या विविध नात्यांनीं त्यांनीं केलेलें महान् कार्य, त्यांचें त्या विविध क्षेत्रांतील स्थान व त्यांची शिकवण या सर्वांचा एकत्र बोध वाचकास सहज होऊं शकेल.

## वाचकांचा-पत्रव्यवहार —

### ‘मानव आणि विश्व’

प्रा. नारायणशास्त्री द्रविड यांच्या ‘मानव आणि विश्व’ या लेखाच्या उत्तरार्धांतील विवेचनांतून अनेक प्रश्न निर्माण होतात. रसेलच्या विचारप्रणालीवर त्यांनीं केलेली टीका कितपत बरोबर आहे अशी शंका येते. याबाबत थोडक्यांत खालीलप्रमाणें विवेचन करतां येईल.

( १ ) शास्त्रीय दृष्ट्या विचार करतां पृथ्वी हा विश्वाचा एक अत्यन्त लहान असा भाग आहे. त्याचप्रमाणें विश्वाचा साकल्यानें विचारकरतां मानवाचें अस्तित्व ही एक गौण बाब ठरते.

( २ ) वरील निष्कर्ष शास्त्रावर आधारलेले आहेत. ते कितीहि अप्रिय असले तरी अमान्य करतां येणार नाहींत. अमान्य करावयाचे असल्यास त्यांचें खंडन खगोलशास्त्र आणि भूगर्भशास्त्र यांच्या आधारें करावें लागेल. प्रा. द्रविड यांची विचारसरणी अशी कीं हे निष्कर्ष अप्रिय आहेत म्हणून त्याज्य वा असत्य आहेत. ही विचारसरणी तत्त्वसंशोधनाच्या दृष्टीनें निरुपयोगी आहे.

( ३ ) रसेल वरील शास्त्रीय निष्कर्ष परत परत सांगतो याचें कारण असें– मानवासाठीं विश्वाचें अस्तित्व आहे असें मानण्यामुळें तत्त्वज्ञानांत घोटाळे निर्माण होतात. ‘जग जें बाहेर पडलें तें पुरुषाच्या प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष प्रेरणेमुळे’ हा प्रा. द्रविड यांनीं सांगितलेला भारतीय सिद्धांत याचें उत्तम उदाहरण होय.

( ४ ) वरील विवेचनाचा असा अर्थ नव्हे कीं व्यक्तीनें आपलें आयुष्य कसेंहि काढावें. वरील शास्त्रीय निष्कर्ष मान्य करूनहि रॅम्से हा तत्त्ववेत्ता असें म्हणतो कीं मानव हा ताऱ्यापेक्षा श्रेष्ठ आहे. कारण मानवाप्रमाणें ताऱ्यांना विचार करतां येत नाहीं, प्रेम करतां येत नाहीं. मानवांबद्दल विचार करण्यांत रॅम्सेचें मन रमतें. रसेलला खगोल शास्त्र अधिक प्रिय आहे. हा वैय्यक्तिक भावनांचा प्रश्न आहे हें रसेलला मान्य आहे. –

( There is no arguing about feelings, and I do not pretend for a moment that my way of feeling is better than Ramsey's, but it is vastly different – My Philosophical Development – page 130 ) हा वैय्यक्तिक भावनांचा प्रश्न सोडून दिला तरी वरील शास्त्रीय सत्य लक्षांत ठेवलें म्हणजे मानवाच्या अहंकाराला मर्यादा पडते. त्याचप्रमाणें विश्वाची योजना मानवाच्या कल्याणाकरितां नाहीं हें लक्षांत आलें म्हणजे व्यक्तीच्या कल्याणाची जबाबदारी मानवसमाजावर येऊन पडते. अन्याय आपोआप नाहींसा होणार नसून त्याकरितां प्रयत्नांची आवश्यकता आहे, ही जाणीव निर्माण होते.

( ५ ) प्रा. द्रविड यांचा सर्वांत महत्त्वाचा मुद्दा असा कीं, रसेलचा चेतनाविषयींचा सिद्धांत खरा असेल तर, रसेलच्या तोंडातून निघणारे शब्द हे एका यांत्रिक प्रतिक्रियेप्रमाणें समजले पाहिजेत, आणि म्हणून त्यांच्या सत्यासत्यतेचा प्रश्न उद्भवत नाहीं. लेखाच्या अखेरीस शंकराचार्यांचा हवाला देऊन या युक्तिवादानुसार अलीकडच्या मानवाच्या सत्य स्वरूपाबद्दलच्या सर्व सिद्धांतांना विशेष तपशिलांत न जातां निकालांत काढतां येतें असें ते प्रतिपादितात. हा भ्रममूलक युक्तिवाद अनेक वेळां केला जातो. हा युक्तिवाद कसा चुकीचा आहे तें प्रा. गिल्बर्ट राइल यांनीं एकेठिकाणीं सुरेखपणें सांगितलें आहे. त्यांचेच मूळ शब्द उद्धृत करणें बरें.

“ The fears expressed by some moral philosophers that the advance of the natural sciences diminishes the field within which the moral virtues can be exercised rests on the assumption that there is some contradiction in saying that one and the same occu-

rrence is governed both by mechanical laws aud moral principles, on assumption as baseless as the assumption that a golfer cannot at once conform to the laws of ballistics *and* obey the rules of golf *and* play with elegance and skill. Not only is there plenty of room for purpose where everything is governed by mechanical laws, but there would be no place for purpose if thing were not so governed. ( The concept of mind – page 81) याचा थोडक्यांत मथितार्थ असा, कीं एखादी घटना एकाच वेळीं दोन भिन्न तत्त्वांनीं नियंत्रित होऊं शकते. एखादी प्रक्रिया यांत्रिक आहे याचा अर्थ तेथे उद्दिष्टांना स्थान नाहीं असा होऊं शकत नाहीं. अत्यन्त ढोबळपणें असें समजलें कीं मेंदू हें एक विचार करण्याचें यंत्र आहे तर त्याच्या विचारक्रियेमध्यें सत्यनिष्ठेला स्थान असूं शकत नाहीं, ही कल्पना चुकीची आहे.

( ६ ) लेखाच्या शेवटीं प्रा. द्रविड असें सुचवितात कीं आत्म्याची शाश्वती ही एक कल्पित बाब असली तरी ती जीवनाच्या दृष्टीनें कठोर सत्यापेक्षां महत्त्वाची आहे. आणि म्हणून तिची चिकित्सा करणें हितावह नाहीं. हा दृष्टिकोन तत्त्ववेत्त्याला न शोभणारा आहे. तत्त्वज्ञानाचें पहिलें उद्दिष्ट सत्यसंशोधन हेंच असलें पाहिजे. तसें नसेल तर तत्त्वज्ञानाची अधोगति झाल्याशिवाय राहणार नाहीं.

—स. आ. सप्रे

---

## श्री. सप्रे यांच्या आक्षेपांना –

### प्रा. द्रविड यांचें उत्तर

‘ मानव आणि विश्व ’ या माझ्या लेखावरील श्री. सप्रे यांचे आक्षेप वाचले. सगळयाच आक्षेपांत त्यांनी मी खोडून काढलेल्या मुद्यांची पुनरावृत्ती केली आहे. गिल्बर्ट राइलच्या एका उक्तीचा उल्लेखच या आक्षेपांत नवीन आहे. कोणी कितीहि विस्तृत लेख लिहिला तरी त्यांतून एखाद्या किरकोळ गोष्टीचें स्पष्टीकरण न येणें अशक्य नाही. तरी पण लेखकाला वाचकाच्या सुज्ञतेवर भरवसा ठेवता येतो. सप्रे यांच्या आक्षेपांवर माझीं उत्तरें थोडक्यांत खालीलप्रमाणे आहेत. हीं उत्तरें माझ्या लेखांत येऊन गेलेलीं किंवा त्यांतून सुचविलीं गेलीं आहेत हें वाचकांच्या लक्षांत येईलच.

( १ ) ‘ शास्त्रीयदृष्ट्या पृथ्वी व तिच्यावर वास करणारा माणूस विश्वाचे नगण्य अंश आहेत ’ हें अत्यंत उथळ असें विधान आहे. शास्त्रीय दृष्टि म्हणजे वैज्ञानिक दृष्टि. ती इन्द्रियें व त्यांसारखीं जीं उपकरणें, त्यांना प्रमाण धरून चालते. पण ज्या इन्द्रियजन्य चेतनेमुळे विश्वाचें ज्ञान ही दृष्टि मिळविते त्या चेतनेला ती जड विश्वाचाच एक भाग समजते. यावर असा प्रश्न उत्पन्न होतो कीं एका जड वस्तूचा दुसऱ्या जड वस्तूवर उमटलेला ठसा ( उदा० ओल्या मातीवर कोणी हात ठेवला तर तिच्यावर उमटलेला हाताचा ठसा ) व चेतनेला आकलन होणारें वस्तूचें स्वरूप यां दोघांमध्ये कोणत्या आधारावर फरक करावयाचा ? शास्त्रीय दृष्टि भोंगळ यथार्थवादावर आधारलेली असते. म्हणून तिचे निष्कर्ष कामचलाऊ स्वरूपाचेच समजले पाहिजेत. शिवाय विश्वाकडे पाहण्याची कलात्मक दृष्टि आहे. विभिन्न तात्विक दृष्ट्या आहेत. या सगळयांना ‘ माणूस ’ हा विश्वाचा क्षुद्र अंश वाटत नाहीं. या दृष्टीचा उल्लेख केला तर शास्त्रज्ञ म्हणेल कीं त्या आभासरूप आहेत. पण मग कलावंत किंवा तत्वज्ञ असा प्रतिवाद करूं शकणार नाहींत काय कीं स्पर्शनेन्द्रियाच्या वापरावरच आधारलेली शास्त्रांची प्रायोगिक पद्धति ही देखील आभासमयच आहे ! ( सौंदर्य व इतर आदर्श असत्य असले तरी त्यांच्या मननांतच विवेकी मानव रममाण होत असतो. असें जें रसेल, ‘ A free Man’s worship ’



अनुक्रमणिका







मध्यें एका ठिकाणी म्हणतो त्यावरून असें दिसून येत नाहीं काय कीं रसेललाहि शास्त्रीय दृष्टि अपुरीच वाटते ? वास्तविक पाहतां शास्त्रीय दृष्टीलाहि इतर दृष्टींचें अधिष्ठान पाहिजेच असतें. विश्वाचें सत्य स्वरूप काहीहि असेल, पण त्याविषयींची ओढ वाटल्याशिवाय शास्त्रज्ञहि शास्त्रीय शोधासाठीं प्रवृत्त होईल काय ? )

( २ ) आणि 'विश्वाचा साकल्याने विचार करावयाचा' म्हणजे काय ? सगळें आदर्श सगळीं ध्येयें, सगळया कलात्मक व तदितर संवेदना. आभासमय आहेत असें विचार न करतां ठरवून टाकणें हाच या विचाराचा उत्कृष्ट मासला नव्हे काय ? माणूस विज्ञानाला क्षुद्र जो वाटतो तो त्याच्या दृश्य अशा क्षुद्र परिमाणामुळें. या गोष्टीचा मी उल्लेख केलाच आहे. पण परिमाण तरी काय आहे ? भोंगळ यथार्थवाद सोडला तर. कोणतेंहि तत्त्वज्ञान किंवा विज्ञानेंहि परिमाणाला स्वतंत्र तत्त्व समजत नाहींत. इलेक्ट्रॉन, प्रोटान हे अणु किंवा विश्वाच्या उत्पत्तीला कारण असलेली महान् नीहारिका (Nebula) सपरिणाम आहेत असें म्हणणें योग्य होईल काय ?

( ३ ) विश्व अनंत काळपर्यंत मानवरहित होतें व काहीं लक्ष वर्षांपूर्वींच मानव या विश्वांत उत्पन्न झाला हा विचारच खरोखर मानवाच्या क्षुद्रतेच्या कल्पनेचा आधार आहे. पण हा विचार मनोरंजक असला तरी अत्यंत पोरकट आहे. एका उदाहरणा-वरून ही गोष्ट स्पष्ट होईल. मानव उत्पन्न होण्या-पूर्वीं जगांत त्रिकोण व अन्य आकृत्या होत्या कीं नव्हत्या असें जर कोणी विचारलें तर काय उत्तर द्यावें ? होत्या असें म्हटलें तर गणितशास्त्र व तसेंच इतर सर्व शास्त्रें याचीं सर्व मानवाशी संबं-धित असलेलीं प्रमेयें सोडून येथें जगांत पूर्वी पासूनच होतीं असें समजावें लागेल. अशा जगांत √-१ सारख्या काल्पनिक संख्यांना कुठे जागा मिळवून द्यावयाची ? पण भूमितींतल्या आकृत्या व त्यांचे गुणधर्म मानवापूर्वी जगांत नव्हते असें मान-ण्याचा अर्थ हा होतो कीं माणूसच जगाचें स्वतःच्या बुद्धीने व कर्तृत्वाने निर्माण करीत आहे. अर्थात एकेका माणसाचें हें कर्तृत्व नसल्यामुळेंच प्रत्येक माणसाला आपल्या कमकुवतपणाचा प्रत्यय येत असतो. शास्त्रीय दृष्टि स्वीकारल्याने व्यक्ति-मत्त्वाची जाणीव कमी होते, पण चेतनेच्या विश्वव्यापी कर्तृत्वाची जाणीव यावयास शास्त्रीय दृष्टीच्या पुष्कळ पलीकडे जाणें आवश्यक असतें. जेम्स वार्डने Realm Of Ends या पुस्तकांत या मुद्याचा विस्तार-पूर्वक विचार केला आहे. श्री. सप्रे यांनीं आवश्यक वाटल्यास या मुद्याचें त्या पुस्तकांतून आकलन करावें.

( ४ ) दुसऱ्या आक्षेपांतहि श्री. सप्रे यांनीं रसेलच्या कथनाचीच पुनरावृत्ति केली आहे. या आक्षेपांत उत्तरार्ह असें कांहींच नाहीं. रसेल कांट बद्दल म्हणतो कीं त्याने कोपर्निकसच्या उलट जाऊन माणसाला परत विश्वाचा मध्यबिन्दु करून टाकलें. कारण मानवाच्या क्षुद्रतेविषयींचें तत्व कांटला व त्यासारख्या इतरांनाहि अप्रिय होतें व असतें. हीच गोष्ट सप्रे यांनी अंधानुकरण न्यायाने आपल्या आक्षेपांत मांडली आहे. यावर मला असें विचारावयाचें आहे कीं कांटनें आपल्या दोन्हीं critique मध्यें जे अनेक युक्तिवाद मांडले आहेत त्यांपैकीं एकाचाहि रसेलने कोणत्याहि पुस्तकांत वा लेखांत विचार केला आहे काय ? तसें न करतां निव्वळ वरीलसारखा पोर-कट आरोप करून कांटसारख्या तत्त्वज्ञाला निकालात काढणें हा एक तर फार मोठा दुराग्रह किंवा बौद्धिक अप्रामाणिकपणा समजावा लागेल. कांटने मानवी बुद्धीचें निसर्गव्यापारांत जे सर्वातिशायी महत्त्व स्वीकारलें आहे, ते निसर्गाची घडण बुद्धी-मुळें होते हें युक्तिवादानें दाखवून देऊनच.



अनुक्रमणिका








( ५ ) वरील विवेचनावरून उघडच आहे कीं माणूस श्रेष्ठ आहे कीं विश्व हा कोणाच्याहि भावनेचा प्रश्न नाहीं. कारण भावना व इतर मनोव्यापार यांच्या समुच्चयांतूनच विश्व निर्माण होत असतें. या तत्वाची कांहीं लोकांना जाणीव असते, कांहींना असत नाहीं. ज्यांना असते त्यांच्या-पुढें विश्व मानवासाठीं आहे किंवा नाहीं हा प्रश्नच उपस्थित होत नाहीं.

( ६ ) गिल्बर्ट राइलच्या एका उद्धरणाचा हवाला देऊन सप्रे म्हणतात कीं, चेतना जरी जडोद्भव असली तरी तिच्यांतून निघालेले विचार सार्थ असावयास कांही हरकत नाहीं. विज्ञानाचे गोडवे गाणाऱ्या सप्रेंनीं इतकें तरी पाश्चात्य विचारकांचें अंधानुकरण करावयास नको होतें. गिल्बर्ट राइल चे Concept Of Mind हें पुस्तक साहित्य या दृष्टीने अत्यंत उत्कृष्ट असलें तरी तत्वज्ञान या दृष्टीनें तृतीय श्रेणीचेंहि म्हणतां येणार नाहीं. वरील युक्तिवाद करतांना एक साधी गोष्ट राइलला समजली नाहीं कीं गोल्फचा खेळ ही जशी एक जड द्रव्याची क्रिया आहे तसाच तो एक खेळहि आहे. उगीच वांकडा तिकडा चेंडू फेकत राहणें ही शुद्ध क्रिया होईल पण विशिष्ट प्रकारें कांहीं लोकच चेंडू हाताळतील तर तो एक खेळ होईल. त्याचप्रमाणें चेतना निव्वळ जड व जड विश्वाचाच एक अंश असेल तर त्या चेतनेच्या प्रेरणेंतून निघणाऱ्या शास्त्र-ज्ञाच्या शब्दांना एखाद्या यंत्राच्या घरघरी इतकाच अर्थ असू शकतो. वास्तव चेतनेमध्ये जडाव्यतिरिक्त असेंहि कांहीं रूप असतें हें स्वीकारणें भाग आहे. जर जडवाद्यानें चेतनेंमध्ये जडाव्यतिरिक्त असाहि एक पैलू असतो हें तत्व स्वीकारलें तर त्याला चैतन्याची सर्वश्रेष्ठता स्वीकारावी लागेलच.

( ७ ) आत्म्याची शाश्वती हें सगळ्या मानवी व्यापारांचें गृहीत कृत्य आहे हेंच मला लेखांतील शेवटच्या परिसंवादावरून सुचवावयाचें आहे, तिचें कल्पितत्व नव्हे. याचा अर्थ असा कीं या कल्पने शिवाय कोणत्याच– शास्त्रीय देखील– विचाराला कांहींच अर्थ उरणार नाहीं.

माझ्यामतें माझ्या लेखामागील भूमिकेचें आवश्यक तितकें स्पष्टीकरण या पत्रांत केलें आहे. जास्त माहिती हवी असल्यास सप्रे यांनीं 'Principal of Individuality and Value' ( Realm of Ends ) सारखीं पुस्तकें काळजी-पूर्वक वाचावीं, त्यांच्या सगळया प्रश्नांचीं उत्तरें देणें शक्य नाही व आवश्यकहि नाही.

– नारायणशास्त्री द्रविड

---

मार्च ६२ च्या अंकांतील श्री. नी. र. वऱ्हाडपांडे यांचा बौद्धांच्या क्षणभङ्गवादावरील लेख वांचून त्यांतील कांहीं दोष मला जाणवले. बौद्धांच्या 'अर्थ-क्रिया कारित्वं सत्वं' या सिद्धान्ताचें समर्थन वऱ्हाड-पांड्यांनी जें उपस्थित केलें आहे तें जरी फारसें सूक्ष्म नसलें तरी तें चूक नाही. पण या समर्थनांतून त्यांनीं क्षणभङ्गासंबंधी जो निष्कर्ष काढला आहे तो मात्र अचूक नाही. वऱ्हाडपांडे यांनी 'Philosophy of Universal Flux,' 'न्यायबिंदुटीका,' इत्यादि पुस्तकें वाचलीं असतीं तर बौद्धांच्या भूमिकेविषयी त्यांचा गोंधळ झाला नसता. बौद्ध सर्व वस्तूंना जसें क्षणिक म्हणतात तसेंच त्यांना ते स्वलक्षणहि म्हणतात. याचा अर्थ असा कीं क्षण व क्षणिक वस्तु हे दोन नसून एकच होत व देश, काल आणि अवस्था या सर्व बाबतीत एका वस्तूचा दुसऱ्या कोणत्याहि वस्तूशी कोणत्याहि प्रकारचा संबंध नसतो. यास्तवच संस्कृत बौद्धग्रंथांत वस्तूंचा उल्लेख 'नील-क्षण' 'पीतक्षण' इत्यादि शब्दांच्या द्वारें केला जातो. 'क्षण' शब्द बौद्धांनी पारिभाषिक करून टाकला आहे. या कारणास्तव एका क्षणानंतर येणारा लगेच दुसरा क्षण कोणता असले प्रश्न बौद्धमतांत असंबद्ध ठरतात. जी वस्तू अगदी 'स्वलक्षण' तिच्यापासून मोजणीच अशक्य आहे. अशा प्रकारच्या प्रश्नांना बौद्ध विकल्प-

वासनेच्या सदरांत टाकतील ही भूमिका अगदी सडेतोड व तर्कसंगतहि आहे पण वऱ्हाडपांड्यांना याच्या उलट रसेलची भूमिका सयुक्तिक वाटते. याचें कारण हेंच असू शकतें कीं रसेलच्या गणिती तत्त्व-ज्ञानाचा त्यांच्या मनावर विलक्षण पगडा बसला आहे.

रसेलच्या सातत्याच्या ( Continuity ) कल्पनेंत अनेक दोष आहेत. एक दोन दोषांचाच फक्त येथें मी उल्लेख करतो. कोणत्याहि एका क्षणानंतर लगेच दुसरा असा, एकहि क्षण असूं शकत नाहीं. कारण कोणत्याहि दोन क्षणांच्या मध्यें अनंत क्षण असूं शकतात असें रसेलला वाटतें. याचा अर्थ असा होतो की एका क्षणानंतरचा कोणताहि क्षण घेतला तरी तो दुसरा, तिसरा, चौथा, पांचवा असा कोणताहि असूं शकतो. पण जो क्षण असा कोणताहि ( अनुक्रमानें ) ठरूं शकतो. त्याला पहिल्याच्या नंतरचा तरी कसें समजावें ? म्हणजे त्याच्या व पहिल्या क्षणाच्यामध्यें व्यवधान आहे. ( कितीहि क्षणांचें तें असो ! ) हें कसें समजावें ? ज्या दोन वस्तूंच्या मध्यें निश्चित असें व्यवधान असतें त्यांच्या बाबतीतच पहिला व दुसरा हे शब्दप्रयोग उपयुक्त ठरतात पण सातत्याचा पुरस्कार करणाऱ्यांना व्यवधानाची निश्चितता स्वीकारतां येत नाहीं. या अडचणींतून बौद्धांनी सांगितल्या प्रकारेंच मार्ग काढतां येऊं शकतो. ( म्हणजे क्षण हे देशतः कालतः व वस्तुतः अपरिच्छिन्न असतात असें समजून ) रसेलनें क्षणाला देशकाला परिच्छिन्न मानलें आहे खरें पण बौद्धांप्रमाणें त्यांना ' वस्तुतः ' अपरिच्छिन्न त्याने मानलेलें नाहीं. त्यामुळेंच त्याच्या भूमिकेंत गोंधळ उत्पन्न झालेला आहे.

रसेलचा गणिती युक्तिवाद सातत्य सिद्ध करण्यासाठी वऱ्हाडपांड्यांनी जो मांडला आहे त्यांत त्यांनी कळत ( कीं न कळत ! ) एक महत्त्वाची पायरी सोडून दिली आहे. रसेलने हा युक्तिवाद कोहेनच्या विचारसरणीवर टीका करताना उपस्थित केला असल्यामुळें त्या संदर्भांतच त्याचा विचार करावयास हवा. पण रसेलनेच येथें चूक केली असल्यामुळे त्याचें अनुकरण करणाऱ्या वऱ्हाडपांड्यांच्या युक्तिवादांत चूक उद्भवल्यास आश्चर्य नाहीं. पहिली गोष्ट अशी कीं ' य=क्ष$^{२}$ ' हें समीकरण संख्यांचें सातत्य सिद्ध करण्यास अगदीं अनुपयुक्त आहे. येथें ' य ' ही संख्या ' क्ष ' या संख्येची अनुवर्ती ( Function ) असणें आवश्यक आहे. पण ज्या दोन संख्यांच्या सातत्याचा प्रश्न उद्भवतो त्यापैकीं एक दुसरीची अनुवर्ती असत नाहीं. दुसरी गोष्ट अशी कीं $\frac{\text{मय}}{\text{मक्ष}} = १$ ( वऱ्हाडपांड्यांचे संकेत पहा ) हें जर खरें असेल तर $\frac{\text{d क्ष}^{२}}{\text{d क्ष}} = २$ ही शून्यलब्धि खरी असूं शकत नाहीं. याचा अर्थ असा नव्हे कीं ही शून्यलब्धि चूक आहे. चलनकलनाच्या नियमांला धरूनच ही शून्यलब्धि आहे. पण य=क्ष=१ हेंहि समीकरण स्वीकारल्यावर ( वऱ्हाडपांड्यांनी ही मधली पायरी मांडलेली नाही ) व तसेच $\frac{\text{मय}}{\text{मक्ष}} = १$ हें समीकरण मान्य केल्यावर ' य ' व ' क्ष ' या वेगवेगळ्या संख्या रहात नाहीत व ' मय ' व ' मक्ष ' यांना अपरिनिष्ठित व्यवधानाच्या ( Stretch ) ऐवजी परिनिष्ठित व्यवधानाचे ( Distance ) स्वरूप प्राप्त होतें, अशा परिस्थितीला हे दोन्ही अंक स्थिर स्वरूप ( Constant ) होतात व यांची शून्यलब्धि दोनच्या ऐवजी शून्य ठरते. याप्रमाणें बारकाईनें पाहिल्यास वरील युक्तिवादांत रसेलचाच गोंधळ झाला आहे. प्रसंगोपात्त नसल्यामुळें जास्त विस्तृत स्पष्टीकरण करतां येत नाही. पण एवढ्यावरून बौद्धांच्या क्षणभङ्गवादाची शंभर टक्के तर्कशुद्धता पहावयास कांही हरकत नाहीं. जरूर भासल्यास वरील मुद्यांचें तपशीलवार विवेचन पुढे केव्हांतरी करतां येईल.

**—नारायणशास्त्री द्रविड**

# प्राज्ञपाठशाळामंडळ ग्रंथमाला

| | | किंमत |
|---|---|---|
| (१) | धर्मकोश- व्यवहारकाण्ड भाग १ ते ३ | |
| | साधी बांधणी ... ... ... | ५२-०-० |
| | कापडी बांधणी ... ... ... | ६४-०-० |
| (२) | धर्मकोश - उपनिषत्काण्ड भाग १ ते ४ | |
| | साधी बांधणी ... ... ... | ११०-०-० |
| | कापडी बांधणी ... ... ... | १२६-०-० |
| (३) | धर्मकोश- संस्कारकाण्ड भाग १ ला .... | ४५-०-० |
| (४) | मीमांसादर्शन ... ... ... ... | ३०-०-० |
| (५) | मीमांसाकोश ... भाग १ ते ५ | १६५-०-० |
| (६) | कौषीतकिब्राह्मणारण्यकविषयकोश ... ... | ६-०-० |
| (७) | हिंदुधर्माची समीक्षा (लक्ष्मणशास्त्री जोशी) ... | ५-०-० |
| (८) | वैदिक संस्कृतीचा विकास ... .. ... | ६-०-० |
| (९) | नवमानवतावाद ... ... ... ... | २-८-० |
| (१०) | मानवाचा आदर्श ... ... ... ... | ३-०-० |
| (११) | चार्वाक- इतिहास आणि तत्त्वज्ञान | |
| | (प्रा. सदाशिव आठवले) ... | ३-०-० |
| (१२) | गीता-प्रवेश (डॉ. गो. वि. देवस्थळी) ... | २-८-० |
| (१३) | छत्रपति संभाजी महाराज (श्री. वा. सी. बेंद्रे) .... | १६-०-० |
| (१४) | महाराष्ट्रांतील दुष्काळ व त्यावरील उपाययोजना | |
| | (श्री. चा. अ. दाभोलकर) .... | २-०-० |

अनुक्रमणिका





अनुक्रमणिका

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई